संगीत

# पांघरलेलीं कातडीं



( अंक १ ते ५ )

लेखिका

शकुंतला परांजपे

सन १९४२

किंमत १ रु. ८ आणे.

# प्रस्तावना

स्वतंत्र संगीत नाटक लिहिण्याचा हा पहिलाच प्रयत्न. " चढाओढ " व " सोयरीक " या दोन रूपांतरित नाटिका लिहिल्यानंतर गुरुवर्य अण्णा कर्वे यांच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त " प्रेमाची परीक्षा " हें एक सर्वस्वी स्त्रीभूमिकांचें छोटेसें स्वतंत्र नाटक मीं लिहिलें होतें. परंतु संगीत नाटक लिहिण्याचें धाडस मात्र मी आजच करीत आहें. प्रस्तुत नाटकाचें संविधानक आज अनेक वर्षें माझ्या डोक्यांत घोळतें आहे. याच कथानकावर आधारलेली एक पटकथा मी लखनौला असतांनाच, म्हणजे पांच वर्षांपूर्वीं, लिहिली होती. अमेरिकेंतील एका बोलपट मंडळीकडे त्या पटकथेची मीं प्रथम रवानगी केली. तेथून ती गौरवपर परत आली! त्यांना माझी गोष्ट गमतीदार वाटली, परंतु त्या वेळीं त्यांना गंभीर गोष्टीची जरूर होती. नंतर तीच पटकथा मीं बॉंबे टॉकीजमधील सर रिचर्ड टेंपल यांना सादर केली. त्यांनीं ती अद्याप परत केली नाहीं, परंतु हिंदी बोलपटाला हें संविधानक फार लहान आहे, शिवाय अश्रुविमोचनाला यांत कोठेंही वाव नाहीं, असें आपलें मत मात्र मला त्यांनीं सांगितलें. तदनंतर " आतां बोलपटाच्या नादीं लागूं नको; तुझ्या पटकथेचें एक छानसें नाटकच तयार कर, " असा उपदेश ती. आप्पांनीं मला केला व मींही तसें करावयाचें ठरविलें. परंतु गेलीं साडेतीन वर्षें आमच्या पुण्यांत रिकामपणापुढें मला वेळ मिळेना! तरी गतवर्षी मुंबईस भरलेल्या साहित्य संमेलनाकरितां एक नाटक लिहा अशी मागणी आल्यावर मीं दोन दिवस जोरानें नाटक लिहिण्यास सुरवात केली. त्या अल्पकालीन आवेशांत पहिला प्रवेशही पुरा झाला नाहीं, व वर्षभर तें सर्व लिखाण धूळ खात पडलें होतें. गेले दीड दोन महिने मात्र माझ्या अंगांत भूत संचारलें असलें पाहिजे, कारण मला या नाटकाशिवाय दुसरें कांहीं दिसतच नाहीं. चार वर्षांपूर्वी एका सभेंत मीं मराठी नाटकांवर टीका करीत असतां श्री. दाजीसाहेब तुळजापूरकरांनीं

मला एक पांच अंकी स्वतंत्र संगीत नाटक लिहून दाखविण्याचें आव्हान केलें होतें. तें आव्हान लक्षांत ठेवून मी हीं **पांघरलेलीं कातडीं** वाचकांस सादर करीत आहे. ती. आप्पांनीं आज्ञा केल्याप्रमाणें हें नाटक " छान " झालें आहें कीं नाहीं, किंवा श्री. तुळजापूरकरांच्या आव्हानाला हें तोंड देईल कीं नाहीं हें ठरवणें माझें काम नव्हे.

" सौदामिनीनें " म्हटलेल्या " अंगाई " व " भिकारीण " या माझ्या दोन कविता पूर्वी **विविधवृत्तांत** प्रसिद्ध झाल्या होत्या. तशीच " भरतीची लाट " ही कविता मीं पूर्वी **रंजन**मध्यें दिली होती.

६–११–४२ **शकुंतला परांजपे**

# अर्पणपत्रिका.



आई,

आज तूं हवी होतीस.

शकणी

# संगीत
# पांघरलेली कातडी

## अंक पहिला

( **प्रवेश पहिला.** आगगाडींतील सेकंड क्लासचा रिकामा डबा. एका कोपऱ्यांत एक ऐटबाज छत्री, एक झिरझिरीत रेशमी गळपट्टा व एका पुस्तकांत खूण म्हणून एक सुवासिक रुमाल ठेवला आहे. शरच्चंद्र व मेघदूत हातांत दोन पेट्या घेऊन प्रवेश करतात. शरदूचा पोषाक विलायती झोकांत असतो. मेघदूत धोतर व नेहरू सदरा घातलेला असतो. )

**मेघदूतः**—बस बुवा एकदांचा कुठें तरी. या डब्यांतून त्या डब्यांत सारखा भटकतोय् लेकाचा. हं, बस इथेंच. डबा छान रिकामा आहे.

**शरद्ः**—मग इथं बसण्यांत रे काय गंमत ? रिकाम्या डब्यांत बसायचं तर मग प्रवास करायचाच कशाला मुळीं ? आपलं घर नि आपली खोली काय वाईट ?

**मेघदूतः**—तर मग इतके डबे पालथे घातले ते सारे रिकामे होते वाटतं ? त्या Restaurant Car च्या शेजारच्या डब्यांत तर आपला एक दोस्तही भेटला होता.

**शरद्ः**—त्याला काय करायचंय घेऊन ? एकादं रंगीत पांखरूं बिखरूं जर का असतं तिथं तर मात्र बसलों असतों.

**मेघदूतः**—अस्सं. एकूण मूळ स्वभाव जाईना हेंच खरं.

**शरद्ः**—कसं बोललास ! ( कोंपऱ्यांतल्या सामानाकडे पाहून ) अरे पण हें बघ काय तें ! ( छत्री उघडतो. )

**मेघदूतः**—ए ! उगीच काय कुणाच्या सामानाला हात लावतोस ?

**शरद्ः**—( गळपट्टा गोंजारतो ) अहाहा ! काय मऊ आहे रे !

**मेघदूतः**—ए गाढवा, ठेव तो खालीं.

**शरद्ः**—( पुस्तक हातांत घेऊन डोळे फिरवीत ) How to make Love ! च्यायला, पोरीसुद्धां इतक्या उघड्यावर असलीं पुस्तकं वाचायला लागल्या कीं ?

**मेघदूतः**— पोरीचंच पुस्तक असेल म्हणून कशावरून रे ?

**शरद्ः**— नाहींतर काय बावळटशास्त्री ? कधीं पुरुष असल्या छत्र्या वापरतात, का असले गळपटे घालतात, का असले रुमाल बाळगतात ? एवढं सुद्धां रे तुला कसं कळत नाहीं ?

( **चालः**–बघुनि सुभद्रेला )

**तरुणींच्या लीला । कशा रे कळती नच तुजला ।**
**नाजुक सुंदर छत्री नामी**
**उन्हांत मुळि नच येई कामीं**
**पाऊस भिजवी अंतर्यामीं**
**परि घेउनि तिजला । फिरती वनमाला कमला ।**
**तरुणींच्या लीला । कशा रे कळती नच तुजला ।**

**गळपट्टा मऊ तलम रेशमी**
**तरिही थंडी झोंबे वर्मी**
**रुमाल नाका येई न कामीं**
**नखऱ्यांच्या लीला । करिती शकुंतला चपला ।**
**तरुणींच्या लीला । कशा रे कळती नच तुजला ।**

**मेघदूतः**—खरं आहे बुवा. इतकं सगळं ध्यानांत नाहीं आलं आपल्या. बरं, पाहूं आण इकडे तें पुस्तक.

**शरद्ः**—छट्, तुझ्यासारख्या कार्तिकस्वामीला काय करायचं आहे तें.

**मेघदूतः**—आणि तुला तरी त्याची काय जरूर रे ? राजाला दिवाळी !

**शरद्**:—तूं म्हणतोस तें खरं आहे मित्रा, पण या पुस्तकांत काय आहे हें समजण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. मात्र तें कोणाचं आहे हें कळण्याची अनिवार उत्कंठा लागून राहिली आहे. ( आंतला रुमाल हुंगीत डोळे मिटतो. ) अहाहा ! काय उंची सेंट आहे.

**मेघदूत**:—चल ठेव खालीं तें सगळं. कोणाचा तरी घाणेरडा रुमाल काय हुंगीत बसला आहेस ? फाजील कुठला ! शिवाय खूणही घालवलीस लेका तिची.

**शरद्**:—या रुमालाची मालकीण किती सुंदर असेल नाहीं ? किती तरुण, किती नाजुक असेल. आपण तर तिची ओळख करून घेणार, तिला गरम गरम चहा पाजणार ! !

**मेघदूत**:—खा लेका मनांत मांडे, देईल तुझ्या हातावर वाटाण्याच्या अक्षता तेव्हां समजेल.

**शरद्**:—अरे जा. अक्षता चारते आहे. अजून एकीनंही कधीं अक्षता चारल्या नाहींत महाराज.

**मेघदूत**:—काय रे पण ही पोरगीच असेल म्हणून कशावरून ? एकादी दहा पोरांची आई असली तर ?

**शरद्**:—अरे काय वेडा बिडा तर नाहींस ? दहा पोरांची आई बोंबलायला How to make love ची उठाठेव रे कशाला करीत बसेल ? शिवाय इतका आपला नखरा करायला फुरसत तरी मिळेल का तिला ? अरे माझ्यावर विश्वास ठेव तूं, हें एक फांकडूं रंगेल पांखरूं असणार बघ.

**मेघदूत**:—हो नुकतीच लग्न झालेली कोणाची तरी बायको असली म्हणजे मग ? बसाल राजेश्री मूग गिळून.

**शरद्**:—( सुस्कारा सोडीत ) असं म्हणतोस ? तर मग आपण या रुमालावरच प्रेम करीत राहणार.

( चालः—वीर शिरोमणि सकल धनुर्धर )

मिळेल जरि नच मजला रम्या सुकुमारी सुंदरी।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥
अर्धांगी दुसऱ्याची ती जरि असेल मित्रा तरी।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥
असेल दिधली तिनें आपुली काया अन्या जरी।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥

हा सुगंध बघ कैसा दरवळे
कशि गोड वीज अंगीं सळसळे
गुलजार रंग झोकानें झळझळे

कवटाळुनिया दोन्ही हातीं माझ्या हृदयावरी।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥
चित्तचक्षुनीं रूप प्रियेचें पाहुनियां अंतरीं।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥
सतत बाळगिन उरीं रुमाला जागा निजलों जरी
करिन मी प्रेम रुमालावरी ॥
मुके मटामट घेइन येतां प्रेमाची सुरसुरी।
करिन मी प्रेम रुमालावरी ॥

स्थापुनी मूर्ति दयितेची मन्मनीं
पूजीन प्रिय रुमाला निशिदिनीं
माझिया हृदयकमलाला अर्पुनी

नसेल नशिबीं प्रिया लाभणें माझ्या जन्मांतरीं ॥
करिन मी प्रेम रुमालावरी ॥

( चुंबन घेऊन रुमाल खिशांत घालतो. )

मेघदूतः--अरे पण जरा त्या पुस्तकावरचं नांव तरी बघ कीं मूर्ख शिरोमणे.

**शरद्ः**—( त्याच्या पाठीवर हात मारीत ) शाबास पठे ! कसं रे सुचलं तुला ? ( वाचीत ) Agnes Anderson, Cowlane, Bombay.

**मेघदूतः**—अरे बापरे ! काळी मड्डम रे काळी मड्डम ! चला आतां रावसाहेब. पुरें झालं संशोधन. नाहींतर चांगली शोभा करील ती तुमची.

**शरद्**:—हो ! वाट बघ ! शोभा करते आहे. कैक काळ्या मडमी पाहिल्या आहेत. उलट आमच्या पोरींपेक्षां त्या शंभर पटीनें चांगल्या असतात बाबा. आपल्या स्त्रीत्वाची त्यांना नसती घमेंड तरी नसते... शिवाय आगगाडींत मैत्री कशी करावी हेंही त्यांना फार उत्तम समजतं. आहे माहीत ?

**मेघदूत**:—एकूण तूं लेका हलत नाहींस इथून.

**शरद्**:—छट्. या वस्तुसंग्रहाच्या मालकिणीला भेटल्याशिवाय कांहीं आपण इथून हलणार नाहीं बोवा. तूं जा हवा तर.

**मेघदूत**:—मग माझं तिसऱ्या वर्गाचं तिकीट बदलून मुद्दाम दुसऱ्या वर्गाचं रे कशाला काढलंस ?

**शरद्**:—कशाला म्हणजे ? तुझ्याबरोबर गप्पा मारायला हव्यात म्हणून. अरे बस इथंच. जरा गंमत तर बघ. पहा कांहीं थोडं फार शिकतां आलं तर ? किती दिवस सोंवळा ब्राह्मण राहशील ?

**मेघदूत**:—हड्. शिकतोय. असला फाजीलपणा नाहीं मला शिकायचा.

**शरद्**:—फाजीलपणा कसला रे ? चित्रकार म्हणवतोस स्वतःला. आणि पोरींच्या बाबतींत इतका सोंवळेपणा करतोस ! म्हणूनच लेका, तुझ्या चित्रांना कोणी विचारीत नाहीं. समजलास. अरे शृंगार हा चित्र-कलेचा आत्मा आहे बाबा. त्याची सेवा केल्याशिवाय ती कला कशी तुझ्या गळ्यांत माळ घालील ?

**मेघदूतः**— न घालूं दे. तूंच कर तिच्या आत्म्याची नी आणखी

कशाची सेवा, मी चालल्लों. ( जाऊं लागतो. त्याचा हात धरून शरद् त्याला ओढतो. )

**शरद्ः**— चालल्लों म्हणे. बस खालीं; अरे मदत होईल तुझी सुरवातीला. प्रकरण रंगांत येऊं लागलं म्हणजे मी डोळा घालीन तुला. मग जा हवा तर.

**मेघदूतः**— इतका रे कसा तूं हलकट ?

**शरद्ः**— काय हवं तें म्हण बुवा. आहे असा आहे. पण ती चटक-चांदणी उगवते आहे कुठें अजून ? ( गळपट्टा कुरवाळून गळ्याभोंवतीं गुंडाळतो. रुमाल हुंगून त्यांत तोंड खुपसतो. इतक्यांत पन्नाशीच्या पुढें गेलेली तुळसा कोळीण रागारागांत प्रवेश करते. व शरद्च्या हातांतला रुमाल हिसकावते व गळ्याला गुंडाळलेला गळपट्टा ओढते. त्याला थोडा फास लागल्यासारखें होतें. )

**तुळसाः**— कुनाच्या र सामानाला हात लावतायस ? व्होवी का मुस्कार्डीत ?

**शरद्ः**— बाई हें सामान तुमच्वंच आहे का ?

**तुळसाः**— मांजां असल नाय तर माज्या बापसाचां असल. तुज्ये बापसाचां तर नायना ? ( फिरून गळपट्टा ओढते ) काड तो गलफास. ( शरद् घाबरून गळपट्टा काढतो. तुळसा वाट अडवून उभी रहाते. )

**मेघदूतः**— आच्छा शरद्, जातों मी. प्रकरण चांगलंच रंगांत आलंय् ( जातो )

**शरद्ः**— ( हाक मारीत ) ए मेघदूत थांब कीं, अरे थांब ना, जाऊं नको मला एकटा टाकून, ए थांबना.

**तुळसाः**— का र लफंग्या ? भ्या वाटतां मांजां ? बोलावूं का कासाराला ? बांगड्या भर व्होंच्या तर हातभर ?

**शरद्ः**—चुकलों बाई! हात जोडतों. वाट सोडा आतां.

**तुळसाः**—आतां न्हाईल का ध्येनांत? दुसऱ्याच्ये सामानाला लावशील फिरून हात?

(इतक्यांत सुंदर पोषाक केलेली मंजिरी हातांत एक नखरेबाज पिशवी घेऊन येते.)

**मंजिरीः**—लागलीस भांडायला कोणाशीं तरी? तुला मोकळी सोडायची खोटी कीं तूं आपली कोणावर तरी तोंडसूख घेत असतेस.

**तुळसाः**—हा! नी तपास केल्याबिगर मंज्ये, तूं पर पैल्यान् मनांच हमेशा दटावत्येस. माजां म्हननां दुकून ऐकून घेत न्हाईस. येरींच भांडून गो मनां काय करायचां हाय? पर तुलसाच वाईट. वाईट कसली गाडाव. न्हाईतर इक्तां तुजां बोलनां ऐकाया जगलीच नसती.

**मंजिरीः**— बरं बरं. तुझंच बरोबर आहे. झालं? पण असं आगगाडींत भांडूं नये.

**तुळसाः**—न्हाईतर कुटां भांडावां मानसान्? आज वरीस होऊन ग्येलां, तुजां ढुंगान ठरतांय कुटां दुसरीकडां. सारखां आगीनगाडीला चिकटलां हाय. दिसरात भटकभोवानी मुलुक मोडीत असत्ये ती! येड लागायची पाली आलीय्.

**मंजिरीः**—मग तूं जा कीं दोन महिने कोकणांत. सुकाट, आंबे, फणस, काजू खाऊन ये.

**तुळसाः**—हा! कोकणांत जा नी, तुजां गो कोन बगल. येक वस्त जाग्यावर न्हाइली तर नाक कापूनशान घेन.

**मंजिरीः**—बरं तर. पैजच तुझी माझी. कधीं जातेस.

**तुळसाः**—तर तर, माझं खेटार अडलांय जाया. जलमल्यापासून येक दिस तरी मनां सोडून न्हाइलीस का? आईस गेली देवाकडं तिसऱ्या

दिर्शी. तवापासून मी पाललाय. मार्जांच दूध पिऊन माजलीस गुलामाच्ये नी आतां कोंकनांत दवडत्येस मनां? मी जाम जानार नाय. अश्शी रेटून बसन हतं. ( जोरानें बाकावर बसते. )

**मंजिरी**:—अग ए माझी आई! या डब्यांत तरी बसूं नको. ऊठ, मला दुप्पट पैसे भरावे लागतील. जा. कोंकणांत नको जाऊं. पण आपल्या डब्यांत जा. शहाणी तुळसा. आाणि हें बघ माझं तें निळं पुस्तक राहिलं तिकडेच तें आाण बरं. अग हो, माझा काळा चष्माही त्या पुस्तकांतच असेल. पाडूं बिडूं नको हो पुस्तक, नाहींतर चष्मा फुटेल.

**तुळसा**:—बगतलांस? कशी सुदभावली हायस ती? एक दिसभर माझ्या बिगर तुजां चालत नाय मंज्ये. आतां पुस्तक नी चालसी सांडली असतीस. मंगा तर हा बाप्या तुजां समदां सामान पलवीत व्होता. हाय ठावां? नी तूं माज्येवरच कडाडलीस.

( इतका वेळ शरद् दोघींचें बोलणें ऐकत वर्तमानपत्र वाचण्याचा बहाणा करीत असतो. मधून मधून मंजिरीकडे पहात असतो. आपलें नांव निघतांच बोलूं लागतो. )

**शरद्**:—बाई तुमचा समज चुकीचा झाला आहे. सामान पळवायचा माझा मुळींसुद्धां उद्देश नव्हता.

**तुळसा**:—चाप बस गुलामा. पलवायचा वुद्देश न्हवता! रुमाल घातला व्हतास खिशांत, पटा बांधला व्हतास गल्याला, पुस्तक व्हतां हातांत नी छत्री व्हती खाकोटीस. पलवायचां र काय शिल्लक ठेवलां व्हतांस. बोल कि र आतां. कुनी तोंड धरलां तुजां? सांग, रुमाल खिशांत कशाला घातलास नी पटा गल्याला कशाला गुंडाललास?

**शरद्**:—कसं सांगूं बाई तुम्हाला?

**तुळसा**:—कसां काय? खरां तां सांग. खऱ्याला र कशाचां भ्या.

**शरद्:**— खरंच सांगतों. मी चोर नाहीं.

**तुळसा:**— चोर न्हाईस. चोराचा बाप हायस! गाडीतनां खालीं उतराला व्होंवा असल्या डांबीस लोकांना. तरी मंज्ये, मी तुला हमेशा सांगात असत्यें कीं बाईमानसाच्या डब्यांत बसांवां.

**मंजिरी:**— नको ग बाई. काय तिथें तीं लेंढारभर पोरं. त्यांची ती घाण नी रडारड.

**तुळसा:**— मंग त्यांत गो काय झालां? तूं काय कमी हगलीस का कमी मुतलीस, का कमी रडलीस. मी नाय तुला आयशी येगली वाढावली

**मंजिरी:**— नाहीं कोण म्हणतं आहे?

**तुळसा:**— पोटच्या पोराचं केलं नाय इक्त मी तुज लाड केल. वाट आइस नाय पोरीला. माज्ये एका पोराला पर मी दीड वरीस पाजलां नसल. तूं बायो सा वर्सांची झालीस तरी आमा मागत असस. हाय ठावां.

**मंजिरी:**—हं पुरे पुरे. माहीत आहे मला तें सारं पुराण!

**तुळसा:**— काय म्हाईत हाय डोचकां? पोटच्या धा पोरांना, टाकून तुज्येबराबर वनावना हिंडत्ये तरी तुला त्याचां काय पर नाय (रडूं लागते.)

**मंजिरी:**— आहे ग तुळसा. पण तूं आतां आपल्या डब्यांत जा. तो बघ तिकिटं तपासायला आला. पळ लवकर (तुळसाला ढकलते.)

**शरद्:**— इतका वेळ मी आपली माफी मागायची संधि पहात होतों.

**मंजिरी:**— (हंसत) म्हणजे तुळसानें आपल्याला तोंड उघडायला सवडच दिली नाहीं असंच ना आपलं म्हणणं?

**शरद्:**— मघाशीं आरोपीला आपली बाजू मांडायची दिली होती संधि पण—

**मंजिरी:**—पण ती घेतली नाहीं. होय ना?

**शरद्ः**—तिचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं.

**मंजिरीः**—नाहींच ती कधीं खोटं बोलत.

**शरद्ः**—आपल्या सामानाला हात लावायचा भयंकर अपराध मीं केला होता, म्हणूनच आपल्या क्षमेची याचना करीत आहें.

**मंजिरीः**—क्षमा मागतांना गुडघे टेकले पाहिजेत. निदान हात तरी जोडले पाहिजेत.

**शरद्ः**—एवढंच ना ? ( तो गुडघे टेंकायला जातो तोंच मंजिरी त्याला थांबवते. )

**मंजिरी**—पुरे पुरे. कपडे मळतील कीं.

**शरद्ः**—पण क्षमा केली ना ?

**मंजिरीः**—आपला अपराध काय होता तो कुठं नीट कळला आहे ?

**शरद्ः**—आपल्या बाईनं केलेले सर्व आरोप अक्षरशः खरे आहेत.

**मंजिरीः**—ते आतां माझ्या थोडेच लक्षांत राहिले आहेत ?

**शरद्ः**—मग आतां मीच आपल्यावर आरोप करूं कीं काय ?

**मंजिरीः**—एरवीं क्षमा कशी करणार ?

**शरद्ः**—( डोकें खाजवतो ) हें पहा, गुन्हा फार मोठा आहे. तो सांगायला फार वेळ लागेल. चला, Restaurant Car मध्यें जाऊन आपण जरा चहा वगैरे घेऊं या. तिथेंच मी आपल्याला सर्व सांगतों. चलतां ?

**मंजिरीः**—आत्तांच मी तिकडून छोटी हाजिरी घेऊन आलें आपल्याला जायचं असेल तर जा.

**शरद्ः**—मग राहूं दे. मला नेरळलाच उतरायचं आहे.

**मंजिरीः**—असं का ?

**शरद्ः**— आपण पुण्याला चालल्यां असाल ?

**मंजिरीः**— होय.

**शरद्ः**— कॉलेजांत असतां ?

**मंजिरीः**— नाहीं. कॉलेज सोडून मला दोन वर्षं झालीं.

**शरद्ः**— नेहमीं पुण्यासच राहतां ना ?

**मंजिरीः**— छे.

**शरद्ः**— मग मुंबईस ?

**मंजिरीः**— मुंबईसही नाहीं.

**शरद्ः**— मग कुठें ?

**मंजिरीः**— सांगूं ? आगगाडींत.

**शरद्ः**— आगगाडींत ?

**मंजिरीः**— होय. मला प्रवासाचं वेड आहे. कोठल्याही गांवीं मी एका वेळेस पंधरा दिवसांहून अधिक वेळ रहात नाहीं. तेव्हां आगगाडी हेंच माझं घर नाहीं का झालं ?

**शरद्ः**—बोटींतसुद्धां होऊं शकेल कीं.

**मंजिरीः**—त्याचीच तर वाट पहातें आहें. पण ही जळली लढाई उपटली ना मधें.

**शरद्ः**—या दिवसांत आपल्याला एकटं प्रवास करायची भीति नाहीं वाटत ?

**मंजिरीः**—एकटी कुठें असतें ? माझा संरक्षक शिपाई पाहिलात ना मघाशीं ?

**शरद्ः**—हो पाहिला बुवा.

**मंजिरीः**—मग सांगा, तिचा खडा पहारा असल्यावर मला आहे का कशाची भीति ?

**शरद्:**—एकदम कबूल. कसलीही भीति नाहीं. प्रत्यक्ष हिटलरसुद्धां तिच्यापुढें नांगी टाकील.

**मंजिरी:**—खरं ना? तरी मी नेहमीं म्हणत असतें कीं आमच्या कोंकणच्या कोळणींची एक पलटण उतरवावी जर्मनींत. झाडून सारे नात्सी सैरावरा पळत सुटतील...पण इतका वेळ झाला तरी अजून डोकावली कशी नाहीं बया?

**शरद्:**—ती येणार आहे कीं काय फिरून? मग चाललों मी. (उठतो)

**मंजिरी:**—इतके घाबरतां तिला?

**शरद्:**—हो तर! काय प्रश्न आहे काय?

**मंजिरी:**—अतिशय प्रेमळ बाई आहे ती. माणूस एकदां आपलं म्हटलं कीं जीव देईल त्याच्यासाठीं. पण तिची मर्जी मात्र संपादन केली पाहिजे.

**शरद्:**—तेंच तर कठीण दिसतं आहे.

**मंजिरी:**—कठीण गोष्ट साध्य करण्यांतच पुरुषार्थ असतो. सोपी कोणीही करील.

**शरद्:**—असं म्हणतां? बरं तर मग. बसतोंच मी इथं.

(तुळसा पुस्तक आणि चष्मा घेऊन येते.)

**तुळसा:**—हां घेस मंजे.

**मंजिरी:**—हें काय सांडलंस बाई माझ्या पुस्तकावर?

**तुळसा:**—मीं नाय सांडलां. त्ये बुटलरान् सांडलान्. नी मी म्हणालें भरून देस आतां; तर गुलामाचा दांत इचकून म्हनतो कसा? भरलां तर हाच शिगोशीग मटणान्, आणखी वोतूं कां वांईच? मग मी पर काताबून घेतलां तां पुस्ताक नी फांसला त्येच्या पांढऱ्या कोटाला. आणखी ओतताय वांईच?

**मंजिरी** :—तरी मीं म्हटलं तुला यायला इतका वेळ कां लागला !

**तुळसा** :—जवा का मंज्ये, तांबड नी पिवल डाग पडलं त्ये पांढऱ्ये कोटावर, तवा लागला गुरगुराया "डाम गाड डाम गाड" काय पर मजेशीर दिसत व्हता सांगू !! तो पांडरा पांडरा कोट, कालां कालां मुस्काट, नी रंगी रंगी डाग. माजी खोडी काडाया व्होवी नाय का बुटलरीच्या ?

**मंजिरी** :—एकूण तूं वेटरशीं हुज्जत घालीत बसली होतीस तर. तुळसा, एक दिवस किनी तूं मला आपल्या भांडणापायीं खचित् गोत्यांत आणणार आहेस.

**शरद्** :—पण आतांच्या प्रकरणांत मात्र वेटरच सर्वस्वीं अपराधी होता. तुळसाबाईंची कांहींच चूक नव्हती.

**तुळसा** :—तुला र कोन इचारताय् व्होती का नवती ती ? मंदी नुको तोंड घालूं. चूक नी बराबर, आमचां आमी बगून घ्येव.

**मंजिरी**:—( शरद्ला ) तिच्या नादीं लागण्यांत अर्थ नाहीं. देग तें पुस्तक इकडे.

**शरद्**:—पाहूं तें पुस्तक जरा. इकडे करता का ?

**तुळसा**:—कशाला र ? पलवायचां हाय वाट्टां ?

**शरद्**:—नाहीं तुळसाबाई. नांव पाहून पुढल्या स्टेशनवर दुसरं मिळालं तर घेऊन देईन यांना ?

**तुळसा**:—तूं र कशाला व्होवास घेऊन घेया ? तिच हात मोल्डे, का तिला भीक लागली ?

**मंजिरी**:—तुला सरळ बोलायला येत नाहीं काग ?

**तुळसा**:—न याया काय झालां ? सरल मानसाशी मी सरल बोलतां. पर असल्ये चोराशी वांकड्यांच वागयलां हवां.

**मंजिरी:**— बरं आण इकडे तें पुस्तक (पुस्तक उघडून) अरेरे! याच गोष्टीची घाण झाली.

**शरद्:**—पाहूं, पाहूं कोणती गोष्ट? ‘ रिकामें हृदय ’? वा! फार छान आहे ती गोष्ट...मीं परवांच वाचली एका मित्राकडे. ‘ प्रवासिनी ’ या नांवावर छापली आहे तीच ना?

**मंजिरी:**— हो तीच. इतकं नांव लक्षांत राहाण्याइतकी आवडली आपल्याला?

**शरद्:**— हो बुवा! फारच पसंत पडली आपल्याला. कोण नवीन लेखक आहे कोण जाणें?

**मंजिरी:**— ‘ प्रवासिनी ’ हा लेखक कसा? लेखिका असली पाहिजे नाहीं कां?

**शरद्:**— अहो लेखिका कसली आली आहे? असती, तर खरं नांव कां हो लपवती? पुरुषच असेल कोणी तरी. बायकी नांव घेतल्याखेरीज गोष्टी खपत नसतील म्हणून ‘ प्रवासिनी ’ झालं. दुसरं काय? त्या ‘ कृष्णाबाई ’चा गोपाळकृष्णच निघाला. ‘ विभावरी ’चा सुद्धां असेल कोणीतरी विभाकर नी ‘ शारदेचा ’ शरद्.

**मंजिरी:**—पण ह्या ‘ प्रवासिनी ’चा मात्र कोणी प्रवासी नाहीं हें मी आपल्याला नक्की सांगतें. बायकांना आतां बायकी टोपण नांव घ्यायची चोरीच झाली म्हणायची.

**शरद्:**— म्हणजे, ‘ प्रवासिनी ’ आपल्या परिचयाच्या आहेत तर?

**मंजिरी:**—होय ना, फार दाट परिचयाच्या आहेत.

**शरद्:**—बाकी मीं हें पूर्वीच ताडायला पाहिजे होतं. Agnes Anderson पेक्षां हेंच नांव आपल्याला छान शोभतं!

**मंजिरी:**— Agnes Anderson? कोण Agnes Anderson?

**शरद्**:—कोण म्हणजे ? आपण. आपलं नांव आहे ना तें ? आपल्या त्या पुस्तकावर पाहिलं मीं.

**मंजिरी**:—पुस्तकावर पाहिलंत होय ? मग बरोबर. तें माझ्या एका मैत्रिणीचं पुस्तक आहे.

**शरद्**:—तरी आपलं बोलणं चालणं पाहिल्यावर मलाही तें नांव जरा चमत्कारिकच वाटत होतं. खरोखर इतक्या उत्तम लेखिकेची अशी अचानक ओळख होईल हें माझ्या कधीं स्वप्नींही नव्हतं. आपल्या सर्व गोष्टी आतां वाचून काढल्या पाहिजेत. 'प्रवासिनी !' अगदीं योग्य नांव घेतलं आहे आपण. 'प्रवासिनी'! 'रिकामें हृदय !' अहाहा ! "प्रवासिनी"! 'रिकामें हृदय'!

**तुळसा**:—काय येडबीड तर नाय लागलां ?

**शरद्**:— आलं आहे खरं लागायच्या बेतात. ( सिगारेट केस काढतो.) आपली हरकत नाहीं ना मी सिगारेट ओढली तर ?

**मंजिरी**:—छे छे. मुळींच नाहीं.

**शरद्**:—आपण ओढतां का ?

**मंजिरी**:— नाहीं, मी नाहीं ओढीत. पण तुळसा ओढते.

( शरद् तुळसापुढें सिगारेट केस करतो. )

**तुळसा**:—मनां नुको तुझी सुतक्यागत पांडरी इडी. माजी हाय मनां.

( देशी विडी शिलगावून झुरका ओढते. )

**मंजिरी**:—( सिगारेट केस हातांत घेत ) काय सुंदर डबी आहे. कुठें करवलं हें नक्षीकाम ?

**शरद्**:—काश्मीरला. एका मित्रानं दिली मला ती. ( खिशांतून एक डबा काढीत ) पान तरी खात असाल आपण ?

**मंजिरी**:—मी सुपारीसुद्धां खात नाहीं.

**शरद्**:—तुळसाबाई, आमचं पान तरी चालेल का आपल्याला?

**तुळसा**:—नुको र बाबा. तां पर हाय माज्येजवल. ( चंची काढते व तंबाखू चोळून अर्ध्या पानाबरोबर खाते. )

**शरद्**:—हें पहा प्रवासिनीदेवी, आपण पुण्यास कुठें उतरणार तेवढं सांगायची कृपा करावी. नेरळ येईल इतक्यांत.

**तुळसा**:—तां ठरलां हाय कुटां आमचां.

**शरद्**:—मग उद्यां संध्याकाळीं ७॥ वाजतां पुण्याच्या स्टेशनवर Refreshment Room मध्यें मी आपली वाट पाहीन. याल ना? ( मंजिरी हंसून मान डोलावते ) बरं. नमस्कार. येतों. उद्यांचं विसरूं नका हं. संध्याकाळीं ७॥ वाजतां ( जातो. )

**तुळसा**:—काय नुको जाया उद्यां टेशनावर.

**मंजिरी**:—कां ग बाई?

**तुळसा**:—मना नाय तो बाप्या आवडत.

**मंजिरी**:—मग तूं नको जाऊंस.

**तुळसा**:—तुला पर नाय जाऊं देनार. म्होटा लब्बाड हाय तो. नी बोलतो कसा मिजाशींत? जसा काय राजाचाच पोर लागून गेलाय!

**मंजिरी**:—मग आहेतच ते राजकुमार.

**तुळसा**:—कशावरून गो?

**मंजिरी**:—त्यांच्या सिगारेट केसवर नांव पाहिलं मीं! 'राजकुमार शरश्चंद्र यांस सप्रेम भेट' असं आंत लिहिलं होतं.

**तुळसा**:—चोरलीन् असल कुनाची तरी चांदीची डबी.

**मंजिरीः**—तुझ्या डोक्यानीं एकदा एक वेड घेतलं म्हणजे ब्रह्मदेवाला तरी तें उतरतां येणार का ?

( पुस्तक हातांत घेऊन मंजिरी पाय पसरून बसते व गुणगुणतां गुणगुणतां, ' जमुनातट शाम खेले होरी ' हें गाणें म्हणते. )

**मंजिरीः**—( गाणें म्हणतां म्हणतां एकदम ) तुळसा, अग लोणावळं आलं वाटतं. बघ बघ. सौदामिनी यायची होती इथें. बघ बघ बाहेर उतरून. ( तुळसा उतरते. मंजिरी डोकें बाहेर काढून इकडे तिकडे बघते. तिला लांबून सौदामिनी दिसते.) सौदामिनी, ए सौदामिनी, इकडे इकडे ये. जा जा, तुळसा ती बघ आपल्याला शोधते आहे. ( सौदामिनी येते. )

**सौदामिनीः**—बाई बाई ! काय विलक्षण गर्दी आहे गाडींत. ही ठेव गडे माझी पेटी मंजे तुझ्याजवळ. माझ्या डब्यांत उभं राहायलासुद्धां जागा नाहीं. बरं, मी जातें तिकडे. भेटूं आतां पुण्याला.

**मंजिरीः**—( तिचा हात धरून ) बस इथेंच.

**सौदामिनीः**—आणि माझं तिकीट ? तें तर तिसऱ्या वर्गाचं आहे.

**मंजिरीः**— असूं दे. मी घेईन बदलून. जा ग तुळसा. हें तिकीट घे. गार्डाकडे जा. आणि दुसऱ्या वर्गाचे अधिक पैसे भरून ये. पुरेसे पैसे आहेत ना तुझ्याजवळ ?

**तुळसाः**— म्होप हायत. हा येतोय बग सायब. ( गार्ड येतो ) ए सायबा हकडं येस. हां बग हां टकट बदलून देस बाईच.

**गार्डः**— क्या चाहिये ?

**तुळसाः**— बदलून दुसरा देस.

**गार्डः**— क्या ?

**मंजिरीः**— मेहरबानी करके यह टिकट सेकंड क्लासका बना दीजिये.

**गार्डः**— बहोत आच्छा. दो रुपया चार आना और देना पडेगा.

**मंजिरीः**— देग तुळसा. ( तुळसा कनवटीची पांच रुपयाची नोट गार्डाच्या हातावर ठेवते. तो कागद लिहून देतो व मोड तुळसाजवळ देऊन जाऊं लागतो. तुळसा मोड न्याहाळते. )

**तुळसाः**— ए सायबा ! हा बग ! हा तुजा बोडका राजा नुको मनां. दुसरा डोचकां झाकलेला देस. बराच हायस कीं रं ( रुपया बदलून घेते. गार्ड जातो.) बगतलांस मंज्ये, आतां योक अचका रुपाया गमावून बसली व्हतीस.

**मंजिरीः**— पण तूं आहेस ना माझी पाठराखीण ?

**तुळसाः**— हाय म्हंजी ? हायच. मांजाच दूध पिऊन माजलीस बायो.

**मंजिरीः**— मग आतां या रुपयाची चोळी शिवूं का तुला ?

**तुळसाः**— मनां गो काय करायची ? तूं आपल्यालाच शीव. त्या लंगोट्या घालतेस त्येनीं छाती काय पर ताठ ऱ्हात नाय ?

**सौदामिनीः**— काय ग बडबडते आहे ही तुळसा ?

**मंजिरीः**— अग ! आपण बॉडिसेस वापरतों ना, तीं हिला बिलकुल पसंत नाहींत समजलीस ! बॉडिसेस म्हणजे हिच्या भाषेंत लंगोट्या.

**सौदामिनीः**— अस्सं होय ?

**तुळसाः**— अस्सां तर काय ? दिसांतून शंभर येला बंद तुट्टात त्यांच तटातट. माजी चोली बघ. योक गांठ मारली करकचून कीं जाम हलायची नाय.

**सौदामिनीः**— खरंच गडे तुळसा, तुझ्यासारखी चोळी आणि लुगडं नेसवलं मंजीला तर सुंदर दिसेल नाहीं ग ?

**तुळसाः**— सुंदर म्हंजी काय ? अक्षी रानी दिसल रानी ! जर का

खाडीवर नेली माझ्येगत साडी चोली नेसवून तर झाडून सारे कोली धांवत येतील आपली जाली घऊन सावज पकडाया.

**मंजिरीः**—नी मग म्हणेन मी तुळसाचं गाणं.

**आयानों बायानों जातो मुलकाला, सासरच्ये गांवाला निगूनी गो ।**
**माज्ये सासरशीन् कागूद आयलो, माज्ये घोवान् माला**
**बोलवलायन् गो ।**
**कोळी वाड्यामंदे मी जातो भाड्यानं गलबत बगायला गो ।**
**नाकवारे तुज्या होडीचा मोल काय सांग ।**
**दर्याच्ये पान्याला आयलो तुफान ।**
**नाकवारे तुज्या होडीचा फिरव सुकान ।**
**आयानों बायानों जातो मुलकाला, सासरच्ये गांवाला निगूनी गो ।**

( गाणें म्हणायला मंजी सुरवात करते. तुळसा हळूहळू बरोबर गाऊं लागते तशी सौदामिनी मंजीला खूण करून चूप बसवते. तुळसा एकटीच सगळें गाणें म्हणते. गाणें संपल्यावर मंजिरी व सौदामिनी टाळ्या वाजवतात. )

**मंजिरीः**—शाबास, शाबास. ( तिची पाठ थोपटते. )

**तुळसा**:—म्येलीस ! माजी म्हातारीची चेष्टा करत्येस काय गो ?

**मंजिरीः**—बरं. सौदामिनी कांहीं चहा बी घेतेस का ? ( तुळसा जाते.)

**सौदामिनीः**—छे ग आतां कसला चहा ? मी पिठलं भात खाऊन निघालें घरून. खरंच विसरलेच कीं, ह्या घे. आईनें तुझ्यासाठीं [illegible]च्या वड्या करून दिल्या आहेत. ( डबा काढून देते. )

**मंजिरीः**—ओ हो. आण आण पाहूं. ( खाऊं लागते ) छान झाल्या आहेत. बरं सौदामिनी, तुझी काय खबरबात ?

**सौदामिनीः**—माझी कसली आली आहे खबरबात, मास्तरणीची नोकरी केली दोन महिने.

**मंजिरीः**—आणि आतां ?

**सौदामिनीः**—आतां काय ? आतां बेकारी ! सुट्टी झाली ना उन्हाळ्याची ? संपली नोकरी. एक महिन्याचा पगार वांचवयाचा असतो ना ? शाळा सुरू झाली कीं कदाचित् ठेवतील फिरून नोकरीला.

**मंजिरीः**—पण काय ग ? जन्मांत कधीं मास्तरणीचा धंदा करणार नाहीं, असं म्हणत असस ना ?

**सौदामिनीः**—अग म्हणतील पुष्कळजणी. पण चालणार आहे थोडंच. दुसरा धंदा आहे कुठें बायकांना ? डॉक्टरीण, नर्स नाहीं तर मास्तरीण.

**मंजिरीः**—नाहींतर लग्न.

**सौदामिनीः**—तोही धंदा आतां बसत चालला. लग्न झाल्यावरही जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याकरतां नोकरी करावी लागतेच, मग काय फायदा लग्न करण्यांत ?

**मंजिरीः**—पगार काय मिळतो ग मास्तरणींना ?

**सौदामिनीः**—मिळतात पन्नास साठ रुपये.

**मंजिरीः**—आणि लेखनाचं काय झालं तुझ्या ?

**सौदामिनीः**—लेखनाचं काय व्हायचं तें झालं. ( पेटी उघडते ) हें बघ. ह्या दोन गोष्टी परत आल्या. म्हणे ह्या पद्धतीचें लिखाण आम्ही प्र[illegible]करीत नाहीं. ह्या तीन कविता परत आल्या, कां तर म्हणे कवितांना [illegible]च नाहीं. तशीच ही एक नाटिकाही परत आली. शेरा काय ऐकलास का ?

**मंजिरीः**—नाहीं. ऐकूं दे.

**सौदामिनीः**—म्हणे रंगभूमीवर करण्यास योग्य आहे, परंतु छापण्यास योग्य नाहीं. आहे कीं नाहीं ? फुकट कागद आणि शाई खर्च झाली

तेवढी. बंबाला भर होईल म्हणावं तर मेलं आपण लिहिलेलं जाळवतही नाहीं हातानं.

**मंजिरी:**—काय ग ? ‘ प्रवासिनी ’ या नांवावरच पाठवलं होतंस ना हें सारं ?

**सौदामिनी:**—अर्थात्. नांव नाहीं बदलायचं.

**मंजिरी:**—एकूण लेखनाला वेळ मिळतो मास्तरीणबाईंना ?

**सौदामिनी:**—ढुंगण खाजवायला सुद्धां वेळ मिळत नाहीं बाई-साहेब, लेखनाला कुठून मिळणार ?

**मंजिरी:**—मग हें सारं केव्हां लिहलंस ?

**सौदामिनी:**—नोकरी करायच्या आधीं. मागून नाहीं बरं.

**मंजिरी:**—काय ग एवढं काम असतं ?

**सौदामिनी:**—काय काम असतं ? ऐक. ११॥ ते ५ शाळा. ५ ते ६ कवाईत. मग शिकवण्या. हुशार मुली असतात त्यांना शिष्यवृत्त्यांसाठीं तयार करायच्या आणि मद्दड असतील त्यांना परीक्षांतून ओढून काढण्या-साठीं. शिवाय संमेलनं, वनविहार, शारदोत्सव, वनितासमाज, वक्तृत्वोत्ते-जक सभा, आहेतच. झालंच तर गांवांत सर्कस, प्रदर्शन असलं कांहीं आलं कीं मुलांना न्यावं लागतंच. इतिहास-भूगोलांत मुलांना गोडी उत्पन्न व्हावी म्हणून ऐतिहासिक स्थळं दाखवावीं लागतात. हिंडायला नेऊन निसर्ग-परिचय करून द्यावा लागतो. याखेरीज वह्या पेपरांचे गठ्ठे त[illegible]चे असतात ते वेगळेच. आणि रोजच्या पाठांचीं सविस्तर [illegible] लिहावीं लागतात तीं आहेतच आणखी वर.

**मंजिरी:**—बापरे ! इतकं काम असतं तुम्हांला ?

**सौदामिनी:**—शिवाय कोणत्याही सार्वजनिक संस्थेकरतां निःस्वार्थी बुद्धीनें काम करणारं मनुष्यबळ कमी पडलं कीं शाळांतून सक्तीची भरती

करतां येते. कुणीही निवडणुकीला उभा राहिला कीं त्यानें शाळेच्या मुख्यांना भेटावं. फार तर शेंदोनशें रुपये शाळेला द्यावे. त्याच्याकरतां मतं मागत हिंडायला आमचं राखीव सैन्य सज्जच असतं नेहमीं.

**मंजिरीः**—हें सगळं फुकट ?

**सौदामिनीः**—एक पेलाभर चहा मिळतो ना. अगदीं हाल आहेत मास्तर लोकांचे. तुला सांगतें मंजे, हल्लींच्या युगांत मास्तरणीचा धंदा करणं म्हणजे पाप फेडणं आहे सात जन्माचं.

**मंजिरीः**—मग माझी खासगी कारभारीण होतेस का ? मी तुला महिना ७५ रुपये देईन. आहे कबूल ?

**सौदामिनीः**—तें काम येतं आहे कुठें मला ? मला टंक करतां येत नाहीं कीं लघुलिपी येत नाहीं.

**मंजिरीः**—त्याची नाहीं मुळींच जरूर. गोष्टी, कविता, नाटिका, लिहीत रहायचं हेंच तुझं काम. पटतंय का ?

**सौदामिनीः**—तुला काय वेड बीड तर नाहींना लागलं ?

**मंजिरीः**—वेड ना ? मला नाहीं लागलं. पण लावायचयॣ कुणाला तरी.

**सौदामिनीः**—म्हणजे आहे तरी काय गौडबंगाल ?

**मंजिरीः**—तें नाहीं सांगणार ! नोकरी पत्करतेस का बोल. मात्र मा[illegible]रीची एकच अट आहे.

**सौदामिनीः**—सांगून टाक पाहूं.

**मंजिरीः**—कीं प्रवासिनीचं खरं नांव प्राण गेला तरी कुणाला सांगायचं नाहीं. दे वचन.

**सौदामिनीः**—एवढंच ना ? हात्तिच्या, हें घे वचन, प्रवासिनीचं खरं

नांव मला सांगायचं असतं तर मीं तें नांव घेतलंच असतं कशाला ? सौदामिनी मोडक, एम्. ए. याच नांवावर छापलं असतं माझं लिखाण.

**मंजिरीः**—आणि तें खपलंही असतं अधिक.

**सौदामिनीः**—तें कां म्हणून ? नांव बदलल्यानें लेखांत ग काय फरक झाला असता ?

**मंजिरीः**—काय म्हणजे ? पुरुष लेख लिहून आपल्या बायकांच्या नांवावर कशाला छापतात तें आहे ना माहीत ?

**सौदामिनीः**—मग 'प्रवासिनी' हें काय पुरुषाचं नांव आहे वाटतं, वेडाबाई ?

**मंजिरीः**—नाहीं कशावरून ? एकाद्या पुरुषाला नाहीं का 'प्रवासिनी' 'प्रणयिनी', 'सुहासिनी' 'सुमधुरभाषिणी' अशीं नांवं घेतां येत ?

**सौदामिनीः**—खरंच. हें नव्हतं माझ्या ध्यानांत आलं. तूं तरी बरीच दिसतेस कीं. कुठून ग तुला इतकं बारीक ज्ञान झालं ?

**मंजिरीः**—अग त्याला सतत प्रवास करावा लागतो बाई ! नुसतं 'प्रवासिनी' हें नांव घेऊन नाहीं भागत.

**सौदामिनीः**—बरं. बरं. ठेवला आहे आईनें ढीगभर पैसा म्हणून परवडतात हे खर्चाचे लाड.

**मंजिरीः**—चुप चुप. माझ्या आईचं नांव काढूं नको.

**सौदामिनीः**—बरं चुकलें.

**मंजिरीः**—दे पाहूं तुझं तें बाड इकडे. काय काय आहे याच्यांत ? दोन गोष्टी. एक नाटिका आणि तीन कविता. काय ग, कवितेवर हें His Master's Voice चं चित्र कसलं ?

**सौदामिनीः**—अग त्या चित्रावरच केली आहे ती कविता !

**मंजिरीः**— " गूढ कां तुला ? " अरे वा कल्पना मोठी रम्य आहे.

**सौदामिनीः**— हो ना. मला लहानपणापासून त्या फोनोच्या कण्यांत तोंड घालून ऐकणारं तें कुत्रं इतकं आवडतं कीं—

**मंजिरीः**— कीं आतां तुझ्या त्या आवडीला काव्यरूपी वाचा फुटली. होय ना ?

**सौदामिनीः**— जा ! तुला चेष्टाच करायची असली तर आण इकडे माझी कविता !

**मंजिरीः**— चेष्टा नाहीं. शपथ चेष्टा नाहीं करायची. म्हणून दाखव ना तुझी कविता. म्हण म्हण गडे लवकर.

( **चालः**— उगिच काय बुलबुला )

**सौदामिनीः**— **गासि तान घेऊनी । कुठुनी येतसे ध्वनी ।**
**दिसत ना इथें कुणी । गूढ कां तुला ?**
**सूर निघति सारखे । अचुक शब्द ओळखे ।**
**निकट भाससी सखे । गूढ कां तुला ?**
**व्यर्थ तुजसि धुंडिले । चहुंकडे मीं हुंगिलें ।**
**स्पष्ट बोल ऐकिले । गूढ कां तुला ?**
**दडुनि आंत बैसला । सूक्ष्म रूपि जाहला ।**
**मजसि काय विसरला । गूढ कां तुला ?**

**मंजिरीः**— अरे वा ! सुंदर आहे ग कविता. आणि ही प्रतिभा मास्तरणीच्या धंद्यांत ठार होऊं घातली होती !

**सौदामिनीः**— इश्श. पुरें झालं. किती कौतुक करशील ?

**मंजिरीः**— कौतुक तुझं नाहीं करीत बरं ! ' प्रवासिनी 'चं करतें. लक्षांत ठेव नाहींतर विसरशील. प्रवासिनीचं खरं नांव कुणाला सांगायचं नाहीं.

**सौदामिनीः**—बरं बरं. ठेवलं लक्षांत.

**मंजिरीः**—आतां आपण हें सगळं लिखाण प्रसिद्ध करूं.

**सौदामिनीः**—कोण कुत्रं घेणार तें लिखाण? नुकतंच तर परत आलं आहे.

**मंजिरीः**—त्याची काळजी तुला कशाला? एक जाहिरात दिली मासिकांत कीं हवं तें छापतील संपादक. पण आपल्याला मुळीं तसं करा-यचंच नाहीं. तूं आपलं तुझं सगळं प्रसिद्ध अप्रसिद्ध लिखाण मला आणून दे. आपण पुस्तकरूपानं छापूं सगळं.

**सौदामिनीः**—काय, सगळ्या लिखाणाची खिचडी करायची?

**मंजिरीः**—नाहीं ग. गोष्टींचें एक पुस्तक. कवितांचं दुसरं. नाटिकांचं तिसरं. आणखी कांहीं प्रकार आहे का तुझ्या लिखाणाचा?

**सौदामिनीः**—आहेत कांहीं लेख. पण प्रत्येक प्रकारच्या लिखाणाचें एक एक पुस्तक होण्याइतका ऐवज आहे कुठें माझ्याजवळ?

**मंजिरीः**—मग लिहीं ना आणखी. फुकटची नोकरी दिली आहे का मीं? चल बघ बाहेर त्या झाडाकडे आणि कर कविता. (तुळसा प्रवेश करते.) तुळसा आवर आतां सगळं. सौदामिनीचं सामानहि आपल्यांतच गुंडाळ.

**तुळसाः**—तां मनां ठावांच व्हतां. तूं तिला चार दिस आपल्या बरा-बर ठिवून घेनार तां मनां ठावांच व्हतां.

**मंजिरीः**—अग चार दिवस काय आतां ती नेहमींच आपल्याबरोबर राहणार. माझी नोकरी पत्करली आहे तिनं.

**तुळसाः**—कसली नोकरी? मनां काय धाड भरली हाय तिला नोक-रीला ठ्यवत्येंस ती?

**मंजिरीः**——अग रागावूं नको तुळसा. तुला येणार नाहीं तेवढंच काम ती करील.

**तुळसाः**—मनां येनार नाय तां काम तिला शेंबडीला येनार हाय? ढुंगान पर येत नसल नीट धुतां, काम करत्ये बोडक्याचां!

**सौदामिनीः**——रागावूं नको तुळसा. मी फक्त लिहावाचायचंच काम करीन. मग तर झालं?

**तुळसाः**— कुनाचां लिवनां वाचनां?

**मंजिरीः**—माझं आणखी दुसरं कुणाचं?

**तुळसाः**—काय गो? तुज डोल फुटल का हात मोडल? तिला सांगत्येस आपला लिवनावाचनां कराया तो? इक्ती कालीजांत शिकलीस, तुजां तुला लिवतांवाचतां नाय येत?

**मंजिरी**—माझं मला येतं ग. पण ती किनी आहे उत्तम लेखिका. मात्र तो धंदा कसा करावा हें नाहीं तिला समजत. म्हणून ती आपलंच लेखन लिहील नी मी तें प्रसिद्ध करीन. समजलीस?

**तुळसाः**— काय पर नाय समादलां. काय बडबडलीस तां बायो, मुद्लीच नाय समादलां. पर यवढां समजतां कीं तिचा नी तुजा पर लगीन व्हाया व्होवां. मंग व्होवा त्येवढां लिवावां नी वाचावां. आपुन भटकत्ये दिसरात बैराग्यागत नी आतां त्ये पोरीला लाव वनवासाला! गाडाव कुनीकल्डी.

**सौदामिनीः**——त्यांत वाईट ग काय झालं तुळसा? मला तरी आपला देश कसा ग पाह्यला मिळेल एरवीं?

**तुळसाः**— बगा! तुमी देश बगा नी देश तुमाला बगल. पर उनातानांत वनावना हिंडून जवा का मुस्काटं शाप सुकून जातील तवा कोनीपर बगनार नाय तुमच्याकड. मंग बसा लिवीत नी वाचीत.

**पडदा.**

## पहिला अंक समाप्त.

# अंक दुसरा

(**प्रवेश पहिला**–Refreshment Room. दोन चार वेगवेगळ्या टेबलांवर मंडळीं बसली आहेत. शरद् एका टेबलावर आइस्क्रीम खात बसला आहे. पोषाक संस्थानी पद्धतीचा आहे. मेघदूत हातांत चित्रांचें भेंडोळें घेऊन प्रवेश करतो. )

**शरद्ः**—या कलावंत! किती उशीर केलात हो महाराज. सात वाजून गेले.

**मेघदूतः**—असं ? इतका उशीर झाला ? मला कल्पनाच नाहीं. मीं आपला बसलों होतों चित्र काढीत. अंधार पडायला लागला तसा आलों.

**शरद्ः**—अंधारांत नाहीं का रे चित्रं काढतां येत ?

**मेघदूतः**—हो येतात कीं.

**शरद्ः**—खरंच ? तूं काढलीं आहेस अंधारांत चित्रं ?

**मेघदूतः**—हव्वीं तितकीं काढलीं आहेत.

**शरद्ः**—दाखव पाहूं रे. बाता मारतोय गाढव.

**मेघदूतः**—दाखवीन. पण तीं अंधारांतच पहावीं लागतात.

**शरद्ः**—असं काय ? पाजी लेकाचा. बरं काय घेशील मित्रा ?

**मेघदूतः**—माझं आपलं नेहमींचं ठरलेलं. दुसऱ्याच्या पैशांनीं बिअर. आणि स्वतःच्या पैशानीं एक सिंगल चहा.

**शरद्ः**—ठीक. वेटर दो बिअर लाना. नको नाहींतर. एक बिअर आणि एक खाली सोडा.

**मेघदूतः**—का रे बाबा. एकदम कसली उपरति झाली तुला ? अगदीं ‘ खाली सोडा ’ मागवतोस तो ?

**शरद्ः**—कांहीं नाहीं रे उगीच. खाली सोड्याची चव तरी कळायला हवी ना ?

**मेघदूतः**— येऽ ! केवळ चव कळण्यासाठींच घेत असशील जसा. कांहीं तरी लेका तुझा लांबचा डाव असेल.

**शरद्ः**— नाहीं रे. डाव कसला आला आहे. ( वेटर ड्रिंक्स् आणतो. )

**मेघदूतः**— मी सांगतों, नक्की कांहीं तरी बेत आहे. उगीचच एवढा झोकांत पोषाक केला आहेस वाटतं ? कोणा तरी पोरीला भेटायचं असेल ! अँ ?–हं. आणि तोंडाला दारूची घाण येऊं नये म्हणून 'खाली सोडा' दुसरं काय ? बोल. बरोबर ओळखलं कीं नाहीं ? ( शरद्‌ला हलवतो. )

**शरद्ः**— च्यायला ! तुझ्यापासून कांहींच लपवून ठेवतां येत नाहीं.

**मेघदूतः**— अस्सा. कसा हेरला गुलामाला. बोल आतां. कोणाला भेटायचं आहे ?

**शरद्ः**— तेंहि सांगितलं पाहिजे कां ?

**मेघदूतः**— अर्थात्. नाहीं तर अस्सा तुला चिकटून बसेन गोचिडी-सारखा. ( त्याला मिठी मारतो. ) मग दिसेलच कोण आहे तें.

**शरद्ः**— ( त्याला झटकून ) ए ! सोड मला गाढवा. एवढ्यांत अंगा-वर आली कीं काय बिअर.

**मेघदूतः**— मग सांग तर लवकर. पण काय रे ? तूं इतका लाजाळू केव्हांपासून झालास रे ? खरं म्हणजे मी न विचारतांच तूं मला सांगाय-चास. एकीला भेटायचं असलं तर दहाजणी येणार आहेत असं सांगायचंस. ते सोडून असा 'इश्श बाई, इश्श बाई' काय करीत बसला आहेस बायकांसारखा ?

**शरद्ः**— कारण या वेळेस ती येईलच अशी खात्री वाटत नाहीं रे.

**मेघदूतः**— आच्छा ! एकूण शेराला सव्वाशेर भेटली म्हणायची ! वा ! छान ! उत्तम ! अत्युत्तम ! आपल्याला आनंद झाला बोवा हें ऐकून.

**शरद्**:—अरे ती येईल एक वेळ; पण तिची ती सासू तिला येऊं द्यायला हवी ना?

**मेघदूत**:—सासू? म्हणजे रे काय म्हसोबा? आतां सासवांचीं लचांडं आठवलीं का तुला? अगदीं गोकुळांतला कृष्णच झालास कीं सुनांच्या मागें लागायला!

**शरद्**:—तें काम सोपं होतं रे मित्रा. कारण त्या सासवा अगदीं नेभळट असल्या पाहिजेत. पण ही जगदंबा म्हणजे त्रिभुवनांतल्या सर्व सासवांचा अर्क आहे बाबा. अरे, काल तूं पाहिलीस कीं तिला आगगाडींत; आणि मला एकट्याला तिच्या तावडींत सोडून भागुबाईसारखा पळून गेलास तो चोरा. ( त्याला एक गुद्दा मारतो. )

**मेघदूत**:—असं. असं. असं. ती होय? आहे खरी सासू. अगदीं सोळा आणे सासू. तुला अशीच हवी लेका. पण कायरे म्हसोबा, सुनेची गोष्ट लपवून ठेवली होतीस नाहीं कां? आं? ती, रुमालवाली, छत्रीवाली, गळपट्टावाली, पुस्तकवाली.

**शरद्**:—ए नारोशंकर! हळूं बोल कीं.

**मेघदूत**:—काय रे! ती कशी आहे तें सांग तर खरा.

**शरद्**:—काय सांगूं राजा! आपण तर आजपर्यंत अशी पोरगी पाहिली नव्हती. इतकी सुंदर, इतकी हुषार, इतकी बहुश्रुत, इतकी सज्जन.

**मघदूत**:—अरे बापरे बापरे बापरे! लेका, फारच छाप मारलेली दिसते पोरीनें तुझ्यावर.

**शरद्**:—छाप नाहीं रे मेघदूत. तिचं सगळं कांहीं अगदीं अस्सल आहे बघ. नकली कांहींसुद्धां नाहीं तिच्यांत म्हणून तर इतका...

**मघदूत**:—नकली कांहींसुद्धां नाहीं म्हणे. काळी मड्डम तर आहे ना? अरे ह्या काळया मडमांत नकलीखेरीज दुसरं कांहीं तरी असतं कारे?

**शरद्**:-- अरे नाहीं बाबा, ती काळी मड्डम नाहीं. अगदीं आपलीच आहे. Agnes Anderson हें तिच्या एका मैत्रिणीचं नांव आहे.

**मेघदूत**:—असं होय ? मग तिचं नांव तरी ऐकूंदे सगळं ?

**शरद्**:—सगळं नांव ! तें नाहीं बोवा आपण विचारलं.

**मेघदूत**:—मग केलंस काय इतका वेळ बावळया ? तुला अगदींच बनवलेलं दिसतं आहे तिनं...बरं तीं रहाते कुठें तें तरी विचारलंस ?

**शरद्**:—हो विचारलं.

**मेघदूत**:—मग सांग कीं.

**शरद्**:—आगगाडींत रहाते ती.

**मेघदूत**:—काय ? आगगाडींत राहते ? छान. चला. उठा आतां महाराज. तुम्हांला डाक्टरकडे डोकंच तपासून घ्यायला नेलं पाहिजे. उठा उठा. ( त्याला उठवूं लागतो.)

**शरद्**:—गप रे. कां उगीच मला छळतोयस् ( घड्याळाकडे पहात ) तिची वाट पहातां पहातां माझे इकडे कोण हाल होत आहेत. आणि तुला सुचतेय् थट्टा.

**मेघदूत**:—बघ लेका आतां जन्मभर वाट. ती कसली येते आहे कपाळ. नांवाचा पत्ता लागूं दिला नाहीं पोरीनं. राहते कुठें ? तर म्हणे आगगाडींत. बाबा, तिनं बनवलय् तुला चांगलं. चल तूं आपला, ती नाहीं बसली यायला.

**शरद्**:—मग मी इथेंच मुक्काम करणार. आणि जाईल त्या गाडीच्या प्रत्येक डब्यांत डोकावून पहाणार. नाहींतर स्टेशनमास्तरच्या नोकरीकरतां अर्ज करतो.

**मेघदूत**:—अरे ऽ वेडच लागलं आतां तुला.

( इतक्यांत काळा चष्मा घातलेला भाऊ टेबलाजवळ येऊन शरद्ला नमस्कार करतो. )

**भाऊः**—आपण ओळखलंत नाहीं मला कुमारसाहेब.

**शरद्ः**—नाहीं. कोण ?

**भाऊः**—( चष्मा काढीत ) गरिबाची ओळख कशाला राहील मोठ्या लोकांना ?... मी भाऊ कमलिनीचा.

**शरद्ः**—( त्रासून ) काय पाहिजे ?

**भाऊः**—गरिबाला काय पाहिजे असणार सरकार ? माझी नोकरी सुटली. कमलिनीचं डोकंही आहे तसंच आहे. सारखं डॉक्टरला बोलवावं लागतं. ओढाताण होते पैशाची.

**शरद्ः**—पण महिन्याच्या महिन्याला साडेतीनशें रुपये येतात ना ?

**भाऊः**—या दिवसांत आणि कमलिनीच्या या अवस्थेंत तेवढे कसे पुरावे कुमारसाहेब. थोडं देणं झालं आहे. तो माणूसही बाहेर थांबला आहे. त्याला जर कळलं—

**शरद्ः**—किती पाहिजेत ?

**भाऊः**—फार नको. त्याचें अडीचशें देणं आहे. झालंच तर डॉक्टरचे सव्वाशें शिवाय...

**शरद्ः**—मला हिशोब नको आहे सगळा. किती पाहिजेत ते बोला.

**भाऊः**—एकंदर साडेपांचशें पुरतील.

**शरद्ः**—साडेपांचशें नाहींत. हे चारशें आहेत. घेऊन जा. महिन्याला पन्नास पन्नास कापून घेईन, समजलं.

**भाऊः**— असं कसं चालेल कुमारसाहेब ? आपण भेटलां हें जर कमलिनीला कळलं तर सारं आकाशपाताळ एक करून सोडील.

**शरद्ः**—बरं जा आतां. ( भाऊ जातो. शरद् चिंताक्रांत दिसतो. )

**मेघदूतः**—बराच उदार दिसतोस कीं रे तूं. एकदम एवढ्या मोठ्या

मोठ्या नोटा काढून दिल्यास त्या. आम्ही तर पन्नासाचीही नोट कधीं पाहिली नव्हती.

**शरद्ः**—उदार कसला बाबा? पकडींत सांपडल्याखेरीज कुणी असा षंढासारखा पैसे काढून देतो काय?

**मेघदूतः**—पकडींत सांपडल्याखेरीज?

**शरद्ः**—होय ना. तो साला हरामखोर गेला का नीट बघ जरा.

**मेघदूतः**—( बाहेर जाऊन बघून येतो ) हो गेला. एका लफंग्या मुसलमानाबरोबर जिना उतरतांना दिसला. पण ही भानगड आहे तरी काय?

**शरद्ः**—अरे कमलिनी ही माझी बायको. हा तिचा लफंग्या भाऊ.

**मेघदूतः**—पण वहिनी वारल्या ना पूर्वीच, कुठेंशा पडून? असं ऐकलं बुवा आपण?

**शरद्ः**—( काळजीनें ) काय ऐकलंस?

**मेघदूतः**—कीं त्या कुठेशा पडल्या. दगडावर डोकं हापटून प्राण गेला.

**शरद्ः**—असं वाटलं होतं पहिल्यानं. पण प्राण गेला नाहीं. बेशुद्ध होती चार दिवस. आणि शुद्धीवर आली ती वेडीच झाली. आतां ती आपल्या भावाकडे असते. आणि हा तिचं नांव पुढें करून माझ्याकडून पैसे उकळतो.

**मेघदूतः**—पण तूं ठेवतोस कां त्यांना त्याच्याकडे?

**शरद्ः**—तें एक लांबलचक पुराण आहे बाबा. यानं मोठं कुभांड रचलं आहे माझ्यावर. मी म्हणे तिला छळतों. म्हणून खटला करून यानं तिला वेगळी काढली. शिवाय माझ्या नांवानं वऱ्हाडांत सगळीकडे इतका बोभाटा केला कीं मला मुलगीहि देत नाहीं कोणी.

**मेघदूतः**—म्हणजे एक बायको जिवंत असतां तुला दुसरी करायची आहे कीं काय? हें एक खूळच झालंय् अलिकडे.

**शरद्ः**—अरे बायको जिवंत असून काय कामाची? एक तर तिला लागलंय् वेड आणि दुसरं हा तिला माझ्याकडे राहूं देत नाहीं.

**मेघदूतः**—असं होय? मग गोष्ट वेगळी. (घड्याळाकडे पाहून) अरेच्या! पावणेआठ वाजले कीं. चला.

**शरद्ः**—पावणेआठ वाजले?

**मेघदूतः**—हो ना. चला, तुम्हीही चला मेहरबान. सोडा आतां तिची आशा, ती कांहीं येत नाहीं. आतां नुसतंच 'करिन मी प्रेम रुमालावरी.'

**शरद्ः**—बरं. कळलं! जा तूं जा. मी नाहीं येत. (मेघदूत जातो. शरद् एक सिगारेट ओढतो. जवळच्या एका मासिकांतील एक कविता गुणगुणत बसतो. वेटर येतो.)

**वेटरः**—साब! बिल दे दूं?

**शरद्ः**—नहीं. अबी नहीं. ठहरो. (वेटर जातो. शरद् हातांतलें मासिक ठेवून दुसरें घेतो. मंजिरी येते.)

**शरद्ः**—या! मला वाटलं येतां कीं नाहीं.

**मंजिरीः**—कां उशीर झाला?

**शरद्ः**—आठला दहा मिनिटं आहेत. फक्त वीसच मिनिटं उशीर झाला.

**मंजिरीः**—वीसच ना? मग कांहीं उशीर नाहीं.

**शरद्ः**—पण तीं वीस मिनिटं आम्हांला वीस युगांसारखीं वाटतात त्याची काय वाट?

**मंजिरीः**—बोलायची पद्धत आहे एक, दुसरं काय?

**शरद्ः**—बरं आपण काय घेणार?

**मंजिरीः**—आयस्क्रीम. या दिवसांत दुसरं काय घेणं शक्य आहे?

**शरद्:**— अगदीं बरोबर. वेटर, दो आईस्क्रीम लाना.

**मंजिरी:**— कसलीं हीं इतकीं मासिकं ?

**शरद्:**— ‘प्रवासिनीदेवीं’च्या गोष्टी कवितांची ! आज उद्योग काय होता दुसरा ? दिसेल त्या पुस्तकाच्या दुकानांत ‘प्रवासिनी देवीं’चं लिखाण मागत फिरत होतों.

**मंजिरी:**— पण म्हटलं लेखिकेचं नांव नुसतं ‘प्रवासिनी’च आहे. ‘देवी’ नाहीं पुढें.

**शरद्:**—खरं नांव काय तिचं ?

**मंजिरी:**—प्रवासिनी हें अपुरं पडतं ?

**शरद्:**—असं नाहीं. मला तर तेंच नांव फार आवडतं.

**मंजिरी:**—झालं तर मग.

**शरद्:**— शिवाय आपलं खरं नांव प्रसिद्ध न करण्यांत आपला मोठेपणा दिसतो. त्याचं कौतुकही वाटतं.

**मंजिरी:**— कसला मोठेपणा ?

**शरद्**— असं पहा. एकादीला याच्या निम्म्यांनीं लिहितां येत असतं तर डिग्र्यासकट आपलं लांबलचक नांवच काय पण आपला फोटो सुद्धां छापवती एवढा थोरला चष्मा घातलेला. आदर्श स्त्री म्हणून परिचय सुद्धां प्रसिद्ध करती एकाद्या मासिकांत.

**मंजिरी:**— पण माझा मोठेपणा कुठं आला यांत ?

**शरद्:**—नाहींतर काय ? इतकं प्रतिभासौंदर्य—आणि दुसरंहि सौंदर्य—पदरीं असतां अद्याप अप्रसिद्ध राहूं इच्छिणारी ‘प्रवासिनी’ मोठी नाहीं कां?

**मंजिरी:**—आतां झाली आहे कीं थोडीशी प्रसिद्ध.

**शरद्:**—तें सुद्धां मीं अचानक ओळखलं म्हणून. आपण होऊन

कोठें सांगितलं होतं. आतां मात्र आपलं सगळं लिखाण मला वाचायला दिलं पाहिजे.

**मंजिरीः**— आणि तें एकदां वाचून संपलं कीं, 'प्रवासिनी'ला विसरून जाल, होय ना ?

**शरद्ः**— तें आतां कधींही शक्य नाहीं. स्वतःला विसरेन पण प्रवासिनीला विसरणार नाहीं.... अजून आपलं लेखन चालूंच आहे ना ?

**मंजिरीः**— आहे थोडं बहुत.

**शरद्ः**— आपलं पहिलं लिखाण केव्हां लिहिलं आपण ?

**मंजिरीः**— अं ? शाळेंत असतांनाच लिहिलं असावं.

**शरद्ः**— खरं ? इतक्या लहानपणीं ? कशावर लिहिलं होतं ?

**मंजिरीः**— तें नाहीं बाई आतां आठवत.

**शरद्ः**— पाहिलं ! एकादी असती तर नुसता विषयच काय पण तारीख वारसुद्धां टिपून ठेवती. सुरवात कोणच्या मिनिटाला केली आणि संपलं केव्हां याचंच महत्त्व जास्त. गोष्टींत कांहीं का नसेना. ( वेटर आइस्क्रीम घेऊन येतो. तो पेले ठेवण्याकरतां मासिकें बाजूला करतो. इतक्यांत मेघदूतच्या चित्रांचें भेंडोळें मंजिरीच्या दृष्टीस पडतें. )

**मंजिरीः**— ओहो ! हें काय ? चित्र आहे वाटतं ! पाहूं का ?

**शरद्ः**— पहा ना. ( मंजिरी चित्र उघडते. )

**मंजिरीः**— ( वाचीत ) 'शरच्चंद्र'! अगबाई ! किती सुंदर चित्र काढलं आहे. ही कला आपल्याला अवगत आहे हें मला मात्र कळूं दिलं नाहींना.

**शरद्ः**— ( जरा गोंधळून ) मला अवगत ? कशावरून ?

**मंजिरीः**— कशावरून म्हणजे. आपलं नांव मला माहित नाहीं, असं समजतां होय आपण ?

**शरद्ः**—माझं नांव ?

**मंजिरीः**—होय, होय. आपलं नांव ! काल आपल्या सिगारेट केसवर पाहिलं मी आपलं नांव. आतां लपवाछपवी करून चालणार नाहीं. आपलंच नांव आहे शरच्चंद्र.

**शरद्ः**—कबूल. मी कुठं नाहीं म्हणतों आहे.

**मंजिरीः**—अहाहा! चित्राची कल्पना किती रम्य आहे. चंद्राचं हलणारं प्रतिबिंब पाण्यांत पडलं आहे. होडींत थंडीनें कुडकुडत असलेलं जोडपं एकमेकांना बिलगून बसलं आहे. एकटाच बिचारा राजहंस पंखांत डोकं खुपसून झोंपला आहे.

**शरद्ः**—पाहूं पाहूं तें चित्र.

**मंजिरीः**—जसं कांहीं पाहिलंच नाहीं.

**शरद्ः**—( चित्र पहात ) नाहीं...म्हणजे आतां पहातों आहें तसं पाहिलं नाहीं.

**मंजिरीः**—हो बाई ! चित्रकारांना किती तऱ्हांनीं पहातां येतं तें आम्हा सामान्य जनांना कसं समजावं ?

**शरद्ः**—किती तऱ्हांनीं पहातां आलं तरी लेखिकेच्या पद्धतीनें कुठें येतं पहातां ?

**मंजिरीः**—इश्श ! पुरें झालं. किती चेष्टा करायची ?...खरंच, आपलीं सगळीं चित्रं आतां मला दाखवलीं पाहिजेत बरं का. त्यांतलीं कांहीं पळवून नेणार आहें मी.

**शरद्ः**—अँ...माझीं चित्रं ? कुठें आहेत माझ्याजवळ ?

**मंजिरीः**—बरं नवीन काढाल तीं दाखवावीं.

**शरद्ः**—नवीन ना ? पाहूं कीं काढून.

**मंजिरीः**—आपण चित्रं काढीत असतांना मला पहायला फार आवडेल.

**शरद्ः**—( घाबरून ) अं ह... तेवढं मात्र आपल्याला करतां येणार नाहीं.

**मंजिरीः**—कां तें ?

**शरद्ः**—हें प्हा स्वयंपाक तयार. व्हायच्या आंत जर कोणी स्वयंपाकघरांत गेलं तर खपतं कां बायकांना ? तसं कशाला ? आपण लेखिका आहांत. आपली गोष्ट लिहून पुरी व्हायच्या आंत, लिहीत असतां कोणी खांद्यावरून डोकावून वाचूं लागलं तर खपेल कां आपल्याला ?

**मंजिरीः**—छे ! छे ! मुळींच खपणार नाहीं.

**शरद्ः**—मग राग नाहीं ना आला मी चित्र काढीत असतां दाखवणार नाहीं म्हटलं याचा ?

**मंजिरीः**—राग कसला ? उलट आपला मुद्दा अगदीं कमालीचा पटला.

**शरद्ः**—मग माझी काळजी दूर झाली. बरं आपण इथंच जेवायचं कीं दुसरीकडे कुठं जायचं.

**मंजिरीः**—इथें नको बाई. शिवाय इतक्यांत भूक तरी कुठें लागली आहे ?

**शरद्ः**—मग थोडं फिरून यायचं का ? चला जरा बंडगार्डनवर जाऊं हवं तर. छान चांदणं असेल आज.

**मंजिरीः**—बरं. चला. किती दिवसांत मी तिकडे गेलें नाहीं.

---

( **प्रवेश दुसरा.** बंडगार्डन. मंजिरी व शरद् प्रवेश करतात. )

**मंजिरीः**—काय सुंदर चांदणं पडलं आहे.

**शरद्ः**—हवाही किती आल्हाददायक आहे.

**मंजिरीः**— अगबाई ! तें मघाचं चित्र आपण बरोबर इथूनच काढलं असलं पाहिजे. खरं ना ? कसं ओळखलं. बरोबर तोच देखावा आहे. तेंच चंद्राचं प्रतिबिंब ! तेच डोंगर, तींच झाडं ! फक्त तें प्रेमी जोडपं नी ब्रह्मचारी राजहंस तेवढे आपल्या कल्पनासृष्टींतून अवतरले आहेत. होय ना ?

**शरद्ः**— काय म्हणाल तें खरं आहे.

**मंजिरीः**— केव्हांपासून हा नाद आहे आपल्याला ?

**शरद्ः**— अं ? शाळेंत असल्यापासून बहुतेक.

**मंजिरीः**— होय ? इतक्या लहानपणीं ? शाळेंतलीं आपलीं चित्रं मला पहायला फार आवडतील ?

**शरद्ः**— तीं कुठें राहिलीं आहेत आतां शिल्लक ?

**मंजिरीः**— पाहिलं ! एकादा असता तर सगळीं नीट तारीखवार जपून ठेवता.

**शरद्ः**— पुरे आतां माझी चेष्टा...बसायचं का थोडं ? तें बाक आहे पलीकडे.

**मंजिरीः**— तिकडे नको. इथेंच आणूं तें बांक. हाच देखावा पहात बसणार मी.

**शरद्ः**— बरं मी आणतों तें बांक...नको नको आपण कशाला श्रम घेतां ?

**मंजिरीः**— श्रम कसले आले आहेत. ( दोघें बांक आणतात, व बसतात. )

**शरद्ः**— आतां एकच विनंति आहे. आपण एक गाणं म्हणावं. मला अतिशय आवड आहे गाण्याची.

( मंजिरी एक ठुमरी म्हणते. तो माना डोलावीत ताल धरतो. )

**शरद्ः**— बहोत आच्छा. आपण इतकं उत्तम गात असाल अशी मला कल्पनाच नव्हती. पट्टीच्या गाणारणींना लाजवील आपला गळा; आणि गायकीसुद्धां. कोणाजवळ शिकलां आपण गायला ?

**मंजिरीः**— कुठली शिकलेय. असंच ऐकून ऐकून. आपल्यालाही येत असेल गातां ?

**शरद्ः**— छे.

**मंजिरीः**— इतका षोक असला कीं, स्वतःला थोडं फार येतंच बरं का.

**शरद्ः**— मला गातां नाहीं येत.

**मंजिरीः**— मग वाजवतां येतं, होय ना ? काय वाजवतां आपण ?

**शरद्ः**— ( खिशांतून बांसरी काढीत ) हें भिकार वाद्य वाजवतों मी.

**मंजिरीः**— वा ! भिकार कसलं ? याच्याच सुरावर तर सारं गोकुळ डोलत होतं ना ?

**शरद्ः**— ( बांसरी पुशीत ) मघाशींच साथ करणार होतों. पण वाटलं इतक्या सुंदर आवाजीची खराबी होईल.

**मंजिरीः**— असं वाटलं होय ? मग आतां शिक्षा म्हणून दुप्पट वेळ वाजवलं पाहिजे.

( तो एका नाटकांतलें पद वाजवतो. गुणगुणतां गुणगुणतां ती बरोबर गाऊं लागते. गाणें वाजवणें संपल्यावर तो तिचा हात आपल्या हातांत घेतो. )

**शरद्ः**— परवां जर कोणी मला सांगितलं असतं कीं आज यावेळीं तूं बंडगार्डनवर अशा एका सुंदर अप्सरेबरोबर फिरायला येशील तर मीं त्याला वेड्यांत काढला असता.

**मंजिरीः**— खरंच गडे. मलासुद्धां हें सारं स्वप्नच वाटत आहे.

**शरद्ः**— स्वप्न असेल तर जन्मभर आपण असेंच झोंपून राहूं. प्रवासिनी, तूं मला कधीं विसरणार नाहींस ना ?

**मंजिरीः**— आपणच विसराल. राजघराण्यांतल्या माणसांना अशा एक काय हजारों अप्सरा मिळतील.

**शरद्ः**— जगांत असतील तर मिळतील.

**मंजिरीः**— इतकी अतिशयोक्ति करूं नये माणसानं.

**शरद्ः**— अतिशयोक्ति अगदीं नाहीं. खरंच प्रवासिनी, तुला पाहिल्याबरोबरच मी वेडा झालों. पाहिल्याबरोबर काय, पाहण्याच्या आधींच झालों म्हण ना.

**मंजिरी :**— इश्श. आतां मात्र खरंच वेड्यासारखं बडबडतां आहां.

**शरद् :**— शपथ नाहीं. त्या पुस्तकांतल्या तुझ्या रुमालानेंच मला पहिल्यानें वेड लावलं. आणि तुझ्या त्या तुळसाबाईचं लक्ष नाहीं असं पाहून मी लांबवलासुद्धां तो. हा बघ.

**मंजिरी :**— तुळसाचा आरोप खरा आहे तर मग.

**शरद् :**— लवकर सांग, प्रवासिनीचं हृदय रिकामं आहे ना ?

**मंजिरी :**— कसं असेल रिकामं ? ( तो चिंताग्रस्त दिसतो ) शरच्चंद्राच्या प्रेमानं तुडुंब भरलं आहे.

**शरद् :**— ( तिला मिठी मारीत ) अहाहा ! तेच शब्द फिरून उच्चार. ‘ शरच्चंद्राच्या प्रेमानं तुडुंब भरलं आहे. ’ जातिवंत कवयित्री आहेस. ‘ शरच्चंद्राच्या प्रेमानं तुडुंब भरलं आहे. ’ मला काय भीति वाटत होती.

**मंजिरी :**— असं ?

**शरद् :**— रात्रभर झोंप आली नाहीं इतकी भीति वाटत होती.

**मंजिरी :**— कसली भीति वाटत होती इतकी ?

**शरद्** :—कीं तें हृदय एकाद्या राहूकेतूनें आधींच ग्रासलं असेल अशी.

**मंजिरी** :—होय का ?...आणि तसं असतं तर ?

**शरद्** :—तसं असतं तर ? तर...सांगूं काय ठरवलं होतं तें ?

**मंजिरी** :—सांगा पाहूं.

**शरद्** :—

( **चालः**–वीरशिरोमणि सकल धनुर्धर )

**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**मिळेल जरि नच मजला रम्या सुकुमारी सुंदरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**अर्धांगी दुसऱ्याची ती जरि असेल मित्रा तरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**असेल दिधली तिनें आपुली काया अन्या जरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**हा सुंगध बघ कैसा दरवळे**
**कशि गोड वीज अंगीं सळसळे**
**गुलजार रंग झोकानें झळझळे**

**कवटाळुनिया दोन्ही हातीं माझ्या हृदयावरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**चित्तचक्षुनीं रूप प्रियेचें पाहुनिया अंतरीं ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**सतत बाळगिन उरीं रुमाला जागा निजलों जरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**मुके मटामट घेइन येतां प्रेमाची सुरसुरी ।**
**करिन मी प्रेम रुमालावरी ॥**

**स्थापुनी मूर्ति दयितेची मन्मनीं**
**पूजिन प्रिय रुमाला निशिदिनीं**
**माझिया हृदयकमलाला अर्पुनी**

**नसेल नाशिबीं प्रिया लाभणें माझ्या जन्मांतरीं।**
**करिन कीं प्रेम रुमालावरी॥**

**मंजिरीः**—मोठा नशीववान् आहे माझा रुमाल! पण काय हो गातां येत नाहीं म्हणून थाप मारली ना मघाशीं? बघावं तर काव्यसुद्धां करतां येतं एका माणसाला.

**शरद्ः**—हें कसलं काव्य? साधं बोललों असतों तेंच जरा ठेक्यांत म्हटलं. दुसरं काय?

**मंजिरीः**— हीच तर उत्तम काव्याची कसोटी. पण आतां माझा रुमाल मला परत दिला पाहिजे. देणार ना?

**शरद्ः**—कशाला तो?

**मंजिरीः**— आजची आठवण म्हणून ठेवायला. द्यायचा गडे.

**शरद्ः**—बाकी आतां स्वामिनीची कृपा झाल्यावर रुमालाची काय गरज?

( **चालः**— वीरशिरोमणि सकल धनुर्धर )

**अतां रुमाला, तुझी कशाला, ऐट हवी बा जरी।**
**मिळे मज प्रेमाची सुंदरी॥**
**चतुर लेखिका, मधुर गायिका प्रेम करी मजवरी।**
**रुमाला मिजास तव ऊतरी॥**
**हृदय रिकामें, तुडुंब प्रेमें, शरच्चंद्र हा भरी।**
**रुमाला कींव आपुली करी॥**
**जाहली आस हृदयींची मम पुरी**
**देवता येइ स्वर्गींची भूवरी**
**स्थापिली नित्य हृदयाच्या मंदिरीं**
**भाग्य उदेलें, जरी जाहलें, कशास सांगा तरी।**
**करूं मी प्रेम रुमालावरी॥**

( गाणें म्हणून संपल्यावर रुमालाचें चुंबन घेऊन तिच्या पोलक्याच्या आंत खुपसतो. )

---

( **प्रवेश ३ रा**:--मेघदूतची खोली. ठिकठिकाणीं चित्रें टांगलीं आहेत. नग्न स्त्रीचा एक पुतळा आहे. एका कांचेच्या भांड्यांत भाज्या भरलेल्या आहेत. मेघदूत त्यांचें चित्र काढीत आहे. शरद् मघाच्याच पोशाकांत चित्राचें भेंडोळें घेऊन आंत येतो व मेघदूतच्या पाठीमागें दोन मिनिटें उभा राहतो. )

**शरद्**:—काय अरसिक आहेस रे? कांदे बटाट्यांचं कसलं चित्र काढतोस रे वेड्या?

**मेघदूत**:—काढूं नको तर काय करूं बाबा? पोट आहे ना!

**शरद्**:—पोट आहे तर खा ते कांदे बटाटे. थोडं तरी भरेल. चित्र काढून काय मिळणार आहे?

**मेघदूत**:— मिळतील पांच पंचवीस रुपये.

**शरद्**:— कोण गाढव कांदे बटाट्याच्या चित्राला पांच पंचवीस रुपये द्यायला बसला आहे कुणास ठाऊक!

**मेघदूत**:-- कोण म्हणजे? कांदे बटाट्याचा व्यापारी.

**शरद्**:— असं होय?

**मेघदूत**:—हीं व्यापारी चित्रकला आहे बाबा, याच्यावरच आमचं पोट भरतं, समजलास.

**शरद्**:—काय मिळतं रे असल्या चित्रांना?

**मेघदूत**:—हीं बघ. एका व्यापाऱ्याकरितां असलीं तीन चित्रं काढायचीं आहेत. एक भाज्यांचं, एक फळांचं, आणि एक फुलांचं. बींबियाणं विकणारा मोठा व्यापारी आहे तो. पंचवीस रुपये मिळतील तीन्ही चित्रांचे मिळून.

**शरद्:**—बस्स ? म्हणजे एकाचे दहासुद्धां नाहीं पडले ?

**मेघदूत:**—काय करतोस बाबा ? महिन्याला असलीं तरी दोन कामं कुठं मिळताहेत ?

**शरद्:**—मग सांगितलं होतं कोणीं या धंद्यांत पडायला ? बरं पण मला दे रे जरा तुझा कुंचला. मी पाहातों थोडं काढून.

**मेघदूत:**—आतां माझे कागद नासायचे आहेत वाटतं ? (त्याला कुंचला देतो. तो कुंचला रंगांत बुडवून घोड्याकडे जातो) ए ! बाबा ! थांब जरा. माझं चित्र काढून घेऊं दे. नाहींतर त्याचं वाटोळं करून ठेवशील.

( आपलें चित्र काढतो. दुसरा एक कागद रोवतो. )

**शरद् :**—पण मित्रा आपण कांदे बटाट्याचं नाहीं बुवा चित्र काढणार.

**मेघदूत :**—कांदे बटाट्याचं नको काढूं. आंबेफणसाचं काढ. हें घे.

( आंबेफणस इत्यादि फळांनीं भरलेलें एक सुंदर कांचेचें भांडें पुढें आणून ठेवतो. )

**शरद् :**—हट्. असले आंबे नकोत आपल्याला. ( सभोंवार बघतो. नग्न पुतळ्याकडे पहात. ) हें चित्र काढणार आपण.

**मेघदूत :**—काढा, राजेश्री तें चित्र काढा. ( शरद् थोडा वेळ चित्र काढतो. काढतां काढतां तोंडें वांकडीं करतो. बरेच कागद नासतो. )

**शरद् :**—च्यायला. हें नाहीं बुवा आपल्याला जमत. अरे हें माणसा-सारखंसुद्धां दिसत नाहीं. ( कुंचला फेंकून देतो. )

**मेदूघत :**—ए गाढवा. माझा कुंचला मोडशील ना. इतके कागद नासलेस म्हसोबा तेवढे पुरे नाहीं झाले वाटतं ?

**शरद्:**—काय रे मला शिकवशील कां रे चित्र काढायला ?

**मेघदूतः**—फुकट नाहीं शिकविणार.

**शरद्‌ः**—कोण म्हणतं आहे फुकट शिकव म्हणून? भटजी नाहीं तर! पण काय रे आठ दिवसांत येतील कां अशीं चित्रं काढतां?

**मेघदूतः**—काय म्हणालास? आठ दिवसांत! अरे अकलेच्या कांद्या! आठ वर्षांत नाहीं यायचीं बाबा, म्हणे आठ दिवसांत येतील कां? चित्रं काढायला शिकायचं म्हणजे काय सायकलवर बसायला शिकायचं आहे होय!

**शरद्‌ः**—आठ वर्षांत नाहीं येणार? मग आतां कसं व्हायचं रे माझं?

**मेघदूतः**—कसं काय व्हायचं आहे? काय बडबडतोस आहेस झिंगल्यासारखा? पिऊन बिऊन तर नाहीं ना आलास? अरे हो, ती पोरगी आली होती का रे?

**शरद्‌ः**—हो ना. तीच तर पंचाईत होऊन बसली आहे.

**मेघदूतः**—म्हणजे काय? पडली वाटतं घोरपड गळ्यांत?

**शरद्‌ः**—नाहीं रे बाबा. हें बघ. हें पाहिलंस तुझं चित्र? शरच्चंद्र नांव दिलं आहेस ना त्याला?

**मेघदूतः**—बरं मग?

**शरद्‌ः**—अरे ती समजली कीं मींच हें चित्र काढलं म्हणून.

**मेघदूतः**—मग तूं सांगितलं कां नाहींस?

**शरद्‌ः**—नाहीं रे सांगवलं मित्रा! ती आपण होऊन चित्रकार म्हणून माझी स्तुति करूं लागली. चित्राची स्तुति करूं लागली. म्हणाली, "अहाहा! चित्राची कल्पना किती रम्य आहे. चंद्राचं हालणारं प्रतिबिंब पाण्यांत पडलं आहे. होडींत थंडीनं कुडकुडत असलेलं जोडपं एकमेकांना बिलगून बसलं आहे. एकटाच बिचारा राजहंस पंखांत डोकं खुपसून

झोंपला आहे. " झालं. मलाही वाटूं लागलं कीं मींच तें चित्र काढलं. सांग कशावरून रे नसतं काढलं?

**मेघदूतः**— बोंब लागली. ही दिसली ना आतां आपली कला.

**शरद्ः**—मग तुझीच चूक आहे. तूं आपल्या चित्राला माझं नांव कां दिलंस? बोल.

**मेघदूतः**—अरे वा रे तूं! चंद्राचं चित्र काढलं आणि त्याला शरचंद्र म्हटलं तर लागला कीं म्हसोबा मालकी गाजवायला.

**शरद्ः**—या उन्हाळ्याच्या दिवसांत शरच्चंद्र रे कुठला आठवला तुला?

**मेघदूतः**—आठवला तुझ्या बोडक्याचा.

**शरद्ः**—मग आतां ठरलं. तूंच माझीं चित्रं काढलीं पाहिजेस.

**मेघदूतः**—तर तर! लाडावलास.

**शरद्ः**—अरे पैसे देईन मी तुला, घाबरूं नकोस. तो भाजीवाला देतो त्याच्या तिप्पट देईन मग तर झालं?

**मेघदूतः**—खरं!... का बनवतो आहेस लेका मला?

**शरदः**—नाहीं रे अगदीं खरं. पण काय रे ह्या सर्व चित्रांवर तुझं नांव आहे का रे?

**मेघदूतः**—हो ना; तें बघ उजव्या कोंपऱ्यांत अगदीं बारीक अक्षरांत 'मेघदूत' असं लिहिलं आहे.

**शरद्ः**—मग चल टाक तें पुसून आणि शरच्चंद्र लिही त्या जागीं.

**मेघदूतः**—काय करतां? अडला हरी गाढवाचे पाय धरी.

**शरद्ः**—( हातांतलें चित्र दाखवीत ) मग या चित्रावर रे कसं तुझं नांव नाहीं घातलंस?

**मेघदूत**:—तें पुरं व्हायचं आहे बाबा अजून.

**शरद्**:—असं होय? हें घे तर मग आणि कर लवकर पुरं. मात्र चित्रकाराचं नांव शरच्चंद्र आहे हें लक्षांत ठेव हं. नाहींतर लिहिशील पट्कन् 'मेघदूत.'

**मेघदूत**:—एकूण आतां चित्रकार म्हणून मिरवणार आहांत आपण?

**शरद्**:—अरे मिरवणार म्हणजे काय?

( चालः-शिंग फुंकीत गेला. )

**चित्रकाराचं झोकांत बेमालूम आणीन सोंग।**
**हातीं कुंचला धरीन, असा कागद रोवीन**
**चहूंकडे फाशीन मी रंग। चित्रकाराचं झोकांत...**

**लांब जटा वाढवीन, असे कल्ले ठेवीन**
**चित्रकलेचे फेडीन पांग। चित्रकाराचं झोकांत...**

**रंगीत सदरे घालीन, लांब चिलीम ओढीन!**
**कसा मिरवीन ऐटींत सांग। चित्रकाराचं झोकांत...**

**असे डोळे रोखीन, अशा माना वेळवीन**
**पिंगा घालीत फाशीन रंग। चित्रकाराचं झोकांत...**

**रानावनांत जाईन, फुलंपाखरं पाहीन**
**चित्रकाराच्या झांकींत दंग। चित्रकाराचं झोकांत...**

**सुंदर पोरी आणीन, अशा नखऱ्यांत बसवीन**
**चित्रकाराचे करीन ढंग। चित्रकाराचं झोकांत...**

**पुढें गुढघे टेकीन, हळुच पदर ओढीन**
**तऱ्हेतऱ्हेचे करीन ढंग। चित्रकाराचं झोकांत...**

**गड्या काम तुझं, वरी नांव माझं**
**फोडूं नको हो माझं बिंग। चित्रकाराचं झोकांत...**

तुझीं चित्रं टांगीन, मी वाहवा मिळवीन
  करूं नको बिंगाचा भंग। चित्रकाराचं झोकांत...

प्रदर्शनांत पाठवीन, लोकां पैसे चारीन
  कशी बक्षीसं मिळवीन सांग। चित्रकाराचं झोकांत...

मानपत्र मिळवीन, हार तुरे घालीन
  कलावंताची सजवीन रांग। चित्रकाराचं झोकांत...

सारी मेहनत तुझी, परी कीर्ति माझी
  अरे पैशाची सारीं हीं सोंगं। चित्रकाराचं झोकांत...

अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.



( **प्रवेश पहिला**–बंडगार्डन. मेघदूत ' शरद्चंद्रा 'च्या चित्राला शेवटचा हात देतो आहे, इतक्यांत सौदामिनी एक वही व पेन्सिल घेऊन बांकावर बसते, व मधून मधून पेन्सिल चावीत लिहूं लागते. मेघदूतचें चित्र संपतें. तो शीळ घालीत तें गुंडाळतो. इतक्यांत लिहिण्यांत मग्न झालेली सौदामिनी त्याला दिसते. तो इकडून तिकडून तिच्याकडे पहातो. डोकें खाजवून ठरवल्यासारखें करतो व चुटकी वाजवतो. )

**मेघदूतः**––( खांकरीत सौदामिनीजवळ येत ) अह......अह.

**सौदामिनीः**––कोण पाहिजे ?

**मेघदूतः**––आपल्याला एक विनंति करायची आहे.

**सौदामिनीः**––( कपाळाला आंठ्या घालीत ) कोण तुम्ही ?

**मेघदूतः**––मी मेघदूत...... नाहीं नाहीं मी शरच्चंद्र.

**सौदामिनीः**––एकदां नक्की काय तें ठरवा प्रथम.

**मेघदूतः**–– ठरलं. कांहीं असलं तरी मी चित्रकार आहें.

**सौदामिनीः**–– बरं मग ?

**मेघदूतः**––एक चित्र काढायचं होतं.

**सौदामिनीः**––एक का ? पुष्कळ काढा. ही नदी, हें धरण, हीं झाडं, हीं फुलं, हीं फळं. हे पक्षी.

**मेघदूतः**–– तें झालं सर्व काढून.

**सौदामिनीः**––झालं काढून तर घरीं जा. मला कशाला कटकट करतां ?

**मेघदूतः**—आपली हरकत नसेल तर आपलं चित्र काढायचं होतं.

**सौदामिनीः**—माझं चित्र ? ओळख नाहीं अन् देख नाहीं आणि म्हणे माझं चित्र काढायचं होतं.

**मेघदूतः**—चित्र काढायला ओळखीची काय जरूर ?

**सौदामिनीः**—वा ! बरेच दिसतां की, म्हणे ओळखीची काय जरूर !

**मेघदूतः**—तसं नाहीं माझं म्हणणं......जरूर असेलच तर होईल कीं ओळख.

**सौदामिनीः**—छट् मुळींच नको. मला माहीत आहेत ही सोंगं. असाच कांहींतरी बहाणा करून मुलींना पळवून नेतात हल्लीं. मी फसायची नाहीं.

**मेघदूत** :—छे छे छे. न्यायचं बियचं नाहीं कुठं. इथेंच काढायचं चित्र. हें असंच बसायचं; उठायलासुद्धां नको बांकावरून. जरा मान मात्र थोडी तिकडे वळवायची. ( जवळ जातो. )

**सौदामिनी** :—दूर व्हा. अधिकपणा करूं नका.

**मेघदूत** :—आपण विनाकारण गैरसमज करून घेत आहां.

**सौदामिनी** :—बस्स पुरे झालं.

**मेघदूत** :—आपल्याला कांहीं एक त्रास होणार नाहीं. समजणारसुद्धां नाहीं.

**सौदामिनी** :—जा म्हटलं ना इथून. कांहीं नको माझं चित्र काढायला ( सौदामिनी तोऱ्यांत त्याच्याकडे पाठ करून बसते व पेन्सिल चावीत लिहूं लागते. मेघदूत पहिल्यानें हिरमुसला होऊन सुस्कारा सोडतो, डोकें खाजवतो व तिच्या पाठीकडे पाहून त्याच पाठमोऱ्या पवित्र्यांत तिचें चित्र काढूं लागतो. या अवधींत एक फुगेवाला पीं पीं करीत येतो. दोन

मुलें फुगे विकत घेतात. एक दुसऱ्याचा फुगा फोडतो. तो रडूं लागतो. इतक्यांत एक माणूस हातांत एक बाजाची पेटी व बरोबर एक लहान मुलगी घेऊन येतो. तो पेटी वाजवतो व ती त्याच्या तालावर एक नाच नाचते. लोक जमतात ती पैसे गोळा करूं लागते. पोलीस येतो. )

**पोलीस** :—ए ! इथें नाचायची बंदी आहे. जाव.

**मुलगी** :—पैसा द्या ना शिपाईदादा म्हणजे जातें.

**पोलीस** :—जा जा, पैसा ठेवलाय् फुकटचा.

**मुलगी** :—शिपाई दादा रामराम,
दाढी मिशा लांब लांब ( नाचत नाचत जाते )

( सौदामिनी जांभई देत उठते व मेघदूत चित्र काढीत असलेला पाहून हळूंच पाठीमागें जाऊन चित्र पहाते. )

**सौदामिनी**:—( रागारागानें ) अखेरीस काढलंतच ना माझं चित्र ? थांबा. नको म्हटलं असतां शिकवतें तुम्हांला चित्र काढायला.

( रागारागांत कागद् टरकावते. त्या गर्दींत तिची वही खालीं पडते. )

**मेघदूत**:—अरे अरे अरे. पंचवीस रुपयांचा चुराडा केलात.

( इतक्यांत तिची खालीं पडलेली वही त्याच्या दृष्टीस पडते. तो ती झटकन् उचलतो व तिचे फाडून तुकडे तुकडे करतो. तुकडे तिच्यापुढें करीत. ) घ्या ! जशास तसें.

**सौदामिनी**:—बोलावूं का शिपायाला ?

**मेघदूत**:—बोलवा कीं. बायकांची वीरश्री तेवढ्यापुरतीच.

**सौदामिनी**:—वर तोंड करतां आणखी.

**मेघदूत**:—नाहीं तर काय ? पहिली थप्पड मारायची तेवढीच ऐट. उलट थप्पड मिळाली कीं ती सहन करायची धमक कुठें असते अंगांत ? मग

भागूबाईसारखं बोलावं का शिपायाला. जा बोलवा ना. थांबलांत कशाला ? चित्र फाडायच्या वेळेलाच कां नाहीं बोलावलात ?

**सौदामिनीः**—तुम्हांला नको म्हटलं असतां कां काढलंत माझं चित्र ?

**मेघदूतः**—चित्र तुमचंच कशावरून हो ? तुमचं तोंड तरी दिसतं आहे कां त्याच्यांत ?

**सौदामिनीः**—त्याचाच तर राग आला आहे मला. काढून काढलंत आणि माझं म्हणून कोणाला सांगतांसुद्धां यायचं नाहीं.

**मेघदूतः**—भले ! म्हणजे आतां या बऱ्या आपल्या उलट्या ... ... जाऊं दे, बायको माणूस आहांत. चांगलं सभ्यपणें विचारलं चित्र काढूं का ? तेव्हां धुडकावून लावलंत आणि आतां—

**सौदामिनीः**—तेव्हां मला काय माहीत तुम्ही इतके चांगले चित्र-कार असाल असं ?

**मेघदूतः**—चित्र पाहिल्यावर तर कळलं ना पण ?

**सौदामिनीः**—( मान डोलवीत नाइलाजानें ) हं–

**मेघदूतः**—मग फाडून हो कां टाकलंत बाईसाहेब ?

**सौदामिनीः**—( तोंडाचा फुग्गा करीत ) फाडलं– मी मात्र फाडून दोनच तुकडे केले त्याचे. तुम्हांला केव्हांहि जुळवतां येतील. पण तुम्ही पहा कशा चिंध्या चिंध्या केल्यात माझ्या वहीच्या.

**मेघदूतः**—नाइलाज आहे माझा. कर्ज सव्याज फेडायचं असतं ना, म्हणून करावं लागलं तसं. आतां आपण असं करूं. तुम्ही फिरून तशा बसा. मी चित्र काढतों आणि तुम्ही गोष्ट लिहा. चित्राचं नांवसुद्धां कसं छान सांपडलं आहे.

**सौदामिनीः**—चित्रालासुद्धां नांव लागतं वाटतं ?

**मेघदूतः**—हो तर. या चित्राचं नांव आपण 'पाठमोरी' असं ठेवणार.

**सौदामिनीः**—अगबाई, काय म्हणालांत? 'पाठमोरी'? काय चमत्कार तरी. मीहि माझ्या गोष्टीचं तेंच नांव ठेवलं आहे. (थांबून) चोरी आहे ही!

**मेघदूतः**—अरे बापरे. आतां धांवणार कीं काय शिपायाला बोलवायला?

**सौदामिनीः**—पहा हं. मला फार चिडवलंत तर खरंच बोलावीन बरं का!

**मेघदूतः**—बोलवा बापड्या. पण गळ्यांत येईल हो एकाद वेळेस. कारण खरा चोर कोण? मी कीं, तुम्ही?

**सौदामिनीः**—मी नाहीं, चोर हा शब्द पुल्लिंगी आहे.

**मेघदूतः**—ही भानगड आहे होय? बरं, चला आपण कामाला लागूं.

**सौदामिनीः**—आतां इथें नाहीं व्हायचं काम. मी घरीं गेल्यावरच लिहीन.

**मेघदूत**—असं म्हणतां? (सुस्कारा सोडतो) बरं नमस्कार. खरंच पण आपलं नांव नाहीं कळलं?

**सौदामिनीः**—माझं नांव होय?—माझं नांव पाठमोरी! तुम्हींच ठेवलंत.

**मेघदूतः**—तेंही खरेंच. पण आतां एकदां 'सामोरी' हेंही नांव ठेवायचं आहे. तुम्हीच म्हणालांत मघाशीं.

**सौदामिनीः**—मीं म्हटलं? काय म्हटलं मीं?

**मेघदूतः**—कीं, काढून काढलंत आणि माझं म्हणून कोणाला सांगतासुद्धां यायचं नाहीं.

**सौदामिनीः**— वा ! स्मरणशक्ति मोठी दांडगी दिसते तुमची.

**मेघदूतः**— मग केव्हां काढायचं ? उद्यां याल इथें याच वेळीं ?

**सौदामिनी**— उद्यां नाहीं बाई. उद्यां सिनेमाला जायचं आहे मला.

**मेघदूतः**— सिनेमाला ? कुठल्या.

**सौदामिनीः**— तें ठरायचं आहे अजून.

**मेघदूतः**— बरं बुवा. मग परवां याल ?

**सौदामिनीः**— पाहीन...ही गोष्ट लिहून झाली तर येईन. आणि मीही पण ' सामोरी ' नांवाची दुसरी एक गोष्ट लिहीन.

**मेघदूतः**— फारच उत्तम. नाहींतरी आपले विचार अगदीं कसे तंतोतंत जुळतात तें सिद्धच झालं मघाशीं. तेव्हां आतां ' पाठमोरी ' नंतर ' सामोरी ' असंच ना ?

**सौदामिनीः**— हो असंच. पण तें दुसरं कसलं चित्र आहे हातांत ?

**मेघदूतः**— असंच एक काढलं होतें काल.

**सौदामिनीः**— मिळेल का पहायला ?

**मेघदूतः**— अवश्य ( भिंडोळे पुढें करतो. लगेच मागें घेतो. ) फाडणार नाहीं ना पण ?

**सौदामिनीः**— ( रुसल्याचा आव आणीत ) नको जा. आम्हांला पाह्यचंच नाहीं मुळीं. आणि परवां आम्ही येणार पण नाहीं इथें.

**मेघदूतः**— नका नका. कृपा करून तेवढी शिक्षा मात्र करूं नका. हें घ्या. फाडा हवं तर. शंभर तुकडे करा. मी फिरून काढीन.

**सौदामिनीः**— पण चित्र माझं नाहीं ना ? अन् तेंही पाठमोरं नाहीं ना ? मग हो कशाला फाडूं. बरं पाहूं तर या. ... ओ हो सुंदर आहे हो.

**मेघदूत**— आवडलं तुम्हांला ?

**सौदामिनी**:— हो ना. अतिशय आवडलं. इथेंच काढलंत ना ?

**मेघदूत**:— अगदीं बरोबर ओळखलंत.

**सौदामिनी**:— ही जागा आवडती दिसते तुमची.

**मेघदूत**:— आतां तर फारच आवडूं लागली आहे.

**सौदामिनी**:— ( वाचीत ) 'शरच्चंद्र', नांव वाटतं तुमचं ?

**मेघदूत**:— नाहीं... होय. चित्रकाराचं नांव आहे शरच्चंद्र.

**सौदामिनी**:— म्हणजे तुमचं खरं नांव दुसरं आहे. होय ना ?

**मेघदूत** :— होय. अगदीं असंच. कसं हो ओळखलं तुम्हांला ?

**सौदामिनी**:— पहा कसं ओळखलं तें. जादू आहे ही. ( चित्र गुंडाळीत ) हं. हें घ्या आपलं चित्र. नीट पाहून घ्या हो. फाटलं बिटलं नाहीं ना कुठें ?

**मेघदूत**:— माझं चित्र तेवढं तुम्हीं पाहून घेतलंत. तुमची गोष्ट मात्र मला दाखवली नाहींत ना ?

**सौदामिनी**:— दाखवूं काय डोंबल ? सगळी वहीच्या वही फाडून टाकलीत ती.

**मेघदूत** :— अरे हो. खरंच कीं, विसरलोंच होतों मी.

**सौदामिनी**:— असंच आहे तें. आपलीं दुष्कृत्यं माणूस विसरतो. दुसऱ्याचीं तेवढीं उगाळीत बसतो.

**मेघदूत**:— सगळं कबूल. पण गोष्ट नाहीं तर नाहीं. एकादी कविता तरी म्हणून दाखवा कीं.

**सौदामिनी**:— कोणीं सांगितलं मी कविता करतें म्हणून.

**मेघदूतः**—कोणीं नाहीं सांगितलं. मीं आपली नुसती एक कविता म्हणायला सांगितली. तांब्यांची, गडकऱ्यांची, यशवंतांची, गिरीशांची कोणाचीही चालली असती. पण तुम्हींच आतां आपला गुन्हा कबूल केलात तेव्हां म्हणा झालं आपलीच एकादी.

**सौदामिनीः**—केला ना गुन्हा कबूल. मग गुन्हा कबूल केल्यावर आरोपीला शिक्षा करायची नसते.

**मेघदूतः**—तें कांहीं नाहीं. आमचं चित्र फुकटांत पाहिलंत, आतां आम्हांला कविता म्हणून दाखविलीच पाहिजे.

**सौदामिनीः**—हा जुलूम झाला बाई.

**मेघदूतः**—हें पहा, चित्र शरच्चंद्राचं होतं. तुम्हीही चंद्रावर एकादी कविता केली असलीच पाहिजे. होय कीं नाहीं? सगळेच कवि करतात चंद्रावर कविता.

**सौदामिनीः**—चंद्रावर नाहीं केली.

**मेघदूतः**—मग चंद्रिकेवर केली आहे, होय ना?

**सौदामिनीः**—अं हं. चंद्राच्या आईवर केली आहे.

**मेघदूतः**—चंद्राच्या आईवर? काव्यांत कान्तेला महत्त्व असतं. मातेला नसतं. एक यशवंतानींच काय तें आईचं ऋण फेडलं आहे. तें सुद्धां ती लहानपणींच गेली म्हणून असेल. बाकी बहुधा कान्ता, दयिता, कामिनी, मोहिनी, सुंदरी, हांसरी यांच्याच चरणीं सगळं काव्य वाहिलेलं असतं.

**सौदामिनीः**—असतं ना......पुरुषांचं काव्य. बायकांचं नाहीं.

**मेघदूतः**—खरी गोष्ट आहे. मग आतां बायकांचं काव्य ऐकवलंच पाहिजे आम्हांला.

**सौदामिनीः**—सांपडलें आतां पुरती. वाद घालीत बसलें ते गळ्यां-तच आलं माझ्या. ऐका तर मग.

**मेघदूतः**—पण चंद्राची आई कोण तें आधीं विचारायची परवानगी आहे का ?

**सौदामिनीः**—ओळखा कीं तुम्हीच.

**मेघदूतः**—आम्ही पुरुष पडलों. आम्हाला तें कसं ओळखावं ?

**सौदामिनीः**—हो. तेंही खरंच. 'भरतीची लाट' ही चंद्राची आई. समजलं.

**मेघदूतः**—ठीक. आतां चालू दे.

**सौदामिनीः**—

( **चालः**—आनंदी आनंद गडे )

**उड्या मारुनी, उचंबळोनी, तुषार उसळुनी,**
**गर्जत आलिस भेटाया, ऊत पावली का माया।**
**प्रेमभरानें, आनंदानें, गुंगत गाणें,**
**कशास इतुका आनंद ? बागडसी का स्वच्छंद।**
**तेज फांकलें, बाळ हांसलें, तुला भेटलें,**
**त्याचा का हा आनंद, बाळनुपूरांचा नाद।**
**चंद्र कडेवर, मोद अनावर, नाच निरंतर,**
**झुलव सारखी चंद्राला, भरती आली प्रेमाला।**

**मेघदूतः**—खरं आहे तुमचं म्हणणं. पुरुषाला नसती ही कविता करतां आली.

**सौदामिनीः**—चला बाई. जाऊं दे आतां. बोलतां बोलतां किती उशीर झाला.

**मेघदूतः**—परवाचं विसरूं नका हं. आणि येतांना आपलं कांहीं लिखाण आणा बरोबर.

**सौदामिनीः**—तें कशाला ?

**मेघदूतः**––आम्हांला वाचायचं आहे म्हणून.

**सौदामिनीः**— ज्यांत प्रसिद्ध झालं असेल त्यांतून वाचावं. लेखकांनींच असं आपलं लिखाण मिरवीत फिरायचं असतं वाटतं.

**मेघदूतः**––कोण नाहीं म्हणतं ? पण लेखिकादेवी जर आपलं खरंही नांव सांगत नाहींत, खोटंहि नांव सांगत नाहीं तर कसं वाचावं माणसानीं ? 'पाठमोरी' या नांवावर तर नाहीं ना तुम्ही लिहीत ?

**सौदामिनीः**— नाहीं, अद्याप नाहीं. पुढें कुणीं सांगावं ? ( जाते. )

---

( **प्रवेश दुसरा**—मंजिरीची खोली. मंजिरी तंबोरा छेडीत गाणें म्हणत आहे. एक चीज पुरी झाल्यावर तुळसा आंतून ओरडत येते. )

**तुळसाः**—मंज्ये गो मंज्ये. हायस का मेलीस ? मघा धरनां वराडत्ये तुला ऐकाया नाय काय गो येत ! साडधा वाजून गेल. ऊठ. आंगुलीचां पानीं कवाचां थंड होऊन ऱ्हाइलांय्. हा पग, चाय पर पिआली नाय् बयो ! शाप बिगाडली पोर. चल उठ.

**मंजिरी**—उठतें ग. गाऊं दे मला पोटभर.

**तुळसाः**—म्होप गायलीस. उठत्येस आतां, कां हतंच बालडी उपडी करूं डोचकीवर. न्हाईतर तो भोपलाच टाकत्ये फोडूनशान.

**मंजिरीः**—नको माझी आई ! तेवढं मात्र करूं नकोस. राजकुमारानीं मला कालच नजर केला आहे. किती गोड आहे याचा सूर !.

**तुळसाः**—हा ! गोड हाय ! म्हैस वराडल्यागत वाजतो. नी तुज्ये घरांत गो काय तोटा गेलां व्हतां तंबुऱ्यांनां, म्हून त्या लफंग्याकल्डा तंबूरा आनलास भीक मागून ?

**मंजिरीः**—भीक नाहीं मागून आणला. त्यांनीं आपण होऊनच दिला मला. नी सारखं सारखं लफंग्या लफंग्या म्हणूं नकोस. राजकुमारसाहेब म्हण.

**तुळसाः**— माजां खेटार अडलाय् राजकुमारसाहेब म्हनाया. नी तूं गो कोन मनां शिकवनार ? माजांच दूध पिऊन माजलीस गुलामाच्ये, नी मनां शिकवत्ये असां बोल नी तसां बोल म्हून.

**मंजिरीः**— प्यायलें खरी तुझं दूध. आतां ओकून टाकूं का अगस्ति-ऋषीसारखं.

**तुळसाः**— वोकून टाकत्ये म्हैस. हकडलां मुस्काट तकडं करीन न्हाई माहीत. ( मंजिरी उठते ) हकडं देस, तो भोपळा.

**मंजिरीः**— नको, तूं फोडशील. मीच घालतें गवसणींत.

**तुळसाः**— फुटला तर लई ब्येस व्हईल. आयशींच तंबुरं तरी ब्हाईर निगतील. येकेका पक्षीं येकेक सरस हायत. तंबुरं काय नी सारंग्या काय नी काय काय ! मी सगलां ठिवलाय् जपून. योक बींना पर हाय तुज्ये आयशीची मद्रासकून आनलेली.

**मंजिरीः**— तिचं नांव नको काढूं माझ्या समोर.

**तुळसाः**— नी तुज्ये मावशीचा म्हातारा गवई तुला फुकाट शिक-वाया तयार पर व्हता. पांचशे रुपये मोजले तरी तो जात नाय कुनाकडं असला म्होटा गानारा हाय. पर तुला नाय परवडलां.

**मंजिरीः**— मला नव्हतं गायला शिकायचं.

**तुळसाः**— मंग आता गो कशाला गला फाटस्तोवर वराडतीस दिसरात ?

**मंजिरीः**— कारण राजकुमारांना फार आवडतं माझं गाणं, म्हणून. आतां मला तें वाढवायचं आहे पुष्कळ.

**तुळसाः**— मावशीच्ये गवयाजवळ शिकली असतीस तर आलां तरी असतां वाईच. आतां काय येनार हाय डोचकां ?

**मंजिरी:**—सांगितलं ना माझ्या मावशीचं नी माझ्या आईचं नांव काढूं नको म्हणून.

**तुळसा :**—कां नुको काढूं ? त्येंच्याच पैशावर चैन करत्येस माजोऱ्ये. नी त्येचा नांव कां नुको काढूं ?

**मंजिरी :**—कारण त्या वाईट मार्गानं जात होत्या.

**तुळसा :**—मंग पहिल्यान् फेकून देस त्यांचं वाईट मार्गानं मिलवलेल पैस. फुकाटचां काय व्हतां गोष्टी बोलाया ?

**मंजिरी :**—त्यांचे पैसे फेंकून देऊन मी काय भीक मागूं ?

**तुळसा :** —भीक कशाला व्होवी मागाया ? काम कर.

**मंजिरी :**—कसलं काम करूं ? आईचा धंदा चालवूं पुढें ?

**तुळसा :**—चालव बापडी. चालवलास तर तुला कोन नांवां नाय ठिवनार. येकादा चांगलासा शेट गांठून जलम काडलास त्याच्येबराबर तर काय बिघाडलां ?

**मंजिरी :**—कोण तुळसा ? तूं सांगतेस मला नायकिणीचा धंदा करायला ? अनीतीनं रहायला ?

**तुळसा :**—मी सांगात नाय. पर क्येलास नी नाय क्येलास तरी लोक तुला नायकिणीची पोर म्हूनच हटकनार, किती पर शिकलीस, किती पर कालिजांत गेलीस, किती पर नीट ऱ्हाईलीस, किती पर कुलीनपनाचा आव आणलास तरी लोक तुला वाईटच समदनार. ( मंजिरी रडूं लागते ) उगी. रडूं नको, गप. खरां तांच मी सांगितला. चाप. रडूं नुको. ( आपल्या हातानें तिचे डोळे पुसते. )

**मंजिरी:**—( रडत ) मला लागेल असं बोलतेस, आणि म्हणतेस रडूं नको.

**तुळसाः**—नुको बोलूं त काय करूं ? तुला कलाया नुको ? मी तोंडावर बोलत्ये. सारां जग मांगा बोलतां. सालंत व्हतीस तवा मी तुजा डबा आनायची तवा पर लोक कुजबुजत, ' अरं ती पग रांडच्या पोरीचा डबा घेऊन चालली हाय ' कालीजांत पर तसांच. मनां पैसे घेया बगत लोक, तुझी भेट घ्यायासाठी. येकदा असा एकाचा डोचकां फोडलां हाय.

**मंजरीः**—पुरे तुळसा. आणखी नाहीं ऐकायचं मला.

**तुळसाः**—बरां. चाप झाल्यें मी अगदीं. तुला पर कललांच कीं गुदस्ता. लगीन लगीन म्हून नाचत व्हतीस नी त्ये हरामखोरांन् तुला कशी फसवलीन् हाय ना ठावां ?

**मंजिरीः**—त्याची आठवण सुद्धां नको काढूं.

**तुळसाः**—त म आतां वाईच श्येनी हो बायो.

**मंजिरीः**—आतां झालेंच आहे मी शहाणी. डोक्यावर अक्षता पडे-पर्यंत माझ्या नांवागांवाचा कुणाला थांगपत्तासुद्धां लागूं द्यायची नाहीं.

**तुळसाः**—अक्षता पडाया गो काय उशीर ? मी देत्यें तुला योक सुरेखसा नोवरा पगून.

**मंजिरीः**—मला माधुकरी नको.

**तुळसाः**— माधुकरी कशान् ? तुज्ये जातींत मुलगे काय थोड गेल हायत. नी आतां पुस्काल शिकून श्येने पर व्होतात. पहिल्येगत नुसती सारंगी नी तबला नाय कुटीत बसत. तशापंकीं नोवरा मिलाया गो काय वखत लागनार हाय ?

**मंजिरीः**—तसला नवरा मुळींच नको. आमच्या जातीशीं मला अगदींसुद्धां संबंध नको आहे. मला मोठ्या घराण्यांतलं स्थळ पाहिजे.

**तुळसाः**—म्होठ्या घरान्याला काय चाटायचं हाय ?

**मंजिरी**:—हो. दासदासी, हुजरेशागीर्द, मुजरे–सलाम, थाटमाट सगळी संस्थानी ऐट मिळवीन तरच खरी. श्रीमंत सौभाग्यवती म्हणवून घेईन तरच खरा पराक्रम. आमच्या जातींतला नवरा काय केव्हांही मिळेल.

**तुळसा**:—मर त म कारत्ये. तो लफंग्या व्होवा असल तुला.

**मंजिरी**:—म्हटलस फिरून लफंग्या.

**तुळसा**:—येकदा सोडून धादा म्हनन. लफंग्या, लफंग्या, लफंग्या (दहा बोटं मोजते.) वाघान् खाल्लान् त्याचा मुस्काट. (सौदामिनी येते.)

**सौदामिनी**:—कुणाचं 'मुस्काट खाल्लान् वाघान्?'

**तुळसा**:—तुजां! तुला गो कोनी आतां बोलावलां व्होतान्? ह्ये पोरीला मघा धरनां उठावत्ये आंगुलीला त नाय उटत नी आतां तूं आलीस बडबड कराया. मंग बगायाच नुको.

**सौदामिनी**:—नाहीं बाई मी नाहीं बडबड करीत, जा तूं घाल आपल्या लेकीला न्हाऊं.

**तुळसा**:—आतां अगदीं अंगावरच पीत असल न्हाऊं घालाया. घालायचां तवां घातलां.

**मंजिरी**:—हातांत काय आहे तें सौदामिनी? गोष्ट लिहिलीस?

**सौदामिनी**:—हो ही घे.

**मंजिरी**:—पाहूं कसली गोष्ट आहे? "पाठमोरी". कुठून ग तुला नांवं सुचतात?

**सौदामिनी**:—सुचतात अशींच. याच्या पुढल्या गोष्टीचं नांव मी 'सामोरी' असं ठेवणार आहें. आवडतं तुला?

**मंजिरी**:—छानच आहे. बरीच लवकर लवकर लवकर लिहूं लागलीस कीं ग.

**सौदामिनी**:—न लिहायला काय झालं ? आतां उद्योग काय दुसरा ? पोटाचीही काळजी नाहीं.

**मंजिरी**:—बरं मी जातें आंघोळीला. नाहीं तर ही बया मला फाडून खाईल. ( तुळसाचें नाक धरून हलवते व जाते. )

**तुळसा**:—म्होटी गुलामाची म्हैस ती.

**सौदामिनी**:—हें प्रेम वाटतं तुझं तुळसा ?

**तुळसा**:—हा. आमच्या कोकनच्या मानसांची माया अशीच असत्ये.

**सौदामिनी**:—बरं. मंजिरीचे राजकुमार काय म्हणताहेत ?

**तुळसा**:—डोचकां म्हणताय्. मुद्दलीच पाठ सोडीत नाय पोरीची. नी ती कारटी पर त्येच्यावरच भाललीं हाय. त्ये पहिल्याच्ये गत याणेन् पर तिला हात दावलान् नाय म्हंजी मिलवलां.

**सौदामिनी**:—तुला तेंच सांगायला मी आलें होतें. काल मेला भेटला होता मला.

**तुळसा**:—कोन भेटला व्हता ?

**सौदामिनी**:—तो मेला पहिला.

**तुळसा**:—अर रांडच्या !

**सौदामिनी**:—त्यानें पाळत ठेवली आहे. मंजिरीची राजकुमारांशीं ओळख झाली आहे हें कळलं आहे त्याला. तो करील बघ कांहीं तरी घोटाळा.

**तुळसा**:—क्येलान् तर लई ब्येस झालां. मनां तरी हा लफंग्या कुटां पसंत हाय ?

**सौदामिनी**:—तुझं पुरं झालं. तुझ्या पसंतीला कोणीच यायचं नाहीं.

**तुळसा** :—तूं पगतलायस काय गो त्येला ?

**सौदामिनी** :—नाहीं मीं नाहीं पाहिला.

**तुळसा** :—चालतो कसा मिजाशींत ! जसा काय संवस्थानीकच.

**सौदामिनी** :—अग, मग आहेच तो संस्थानिक. खरंच तुळसा तूं आतां मनावर घे. आणि मंजीला लवकर उजवून टाक. मग कांहीं भीति नाहीं.

**तुळसा** :—मीं तिला कवाच उजवून टाकली असती. पर माजां ऐकत्ये कुटां ती कारटी. माजांच दूध पिऊन मस्ती आलीय् गुलामाचीला.

**सौदामिनी** :—अग, मग तिच्या कलानें घे थोडं. काय ग त्या राजकुमारांत वाईट आहे.

**तुळसा** :—वाईट काय हाय ? पहिल्यान् पगतला तोच मुद्लीच चोरी करतांना.

**सौदामिनी**:—ती ग कसली चोरी ? म्हणे रुमाल अन् गळपट्टा चोरीत होता. त्याला काय कमी आहे म्हणून तो चोरी करील ? कोणी नाहीं असं पाहून जरा वात्रटपणा केला असेल. झालं. अग पुरुष असेच असतात.

**तुळसा**:—तूं आलीस मनां सांगाया पुरुष कसे असतात ते ? येवढी घोडी झालीस तरी येकांदा नवरा पर पटकावतां येईना. मनां सांगत्ये पुरुषाच्या गोष्टी. धा पोरां काढलीत मी. नी ही दुसरीची पालली हाय. समादलीस. ( नोकर येतो. )

**नोकर**:—कोणी शेट चंदुलाल आले आहेत.

**तुळसा**:— अरं शेटाच्या ! ये म्हनावां.

**नोकर**:—मंजिरीदेवी आहेत ?

**तुळसा**:—हायत म्हनावां. (नोकर जातो) सासू हाय म्हनावां मंजिरीदेवीची.

**सौदामिनी**:—तूं त्याला इथें येऊं देणार ?

**तुळसा**:—मंग काय भ्येत्ये का काय ?

**सौदामिनी**:—आणि मंजिरी आली तर ?

**तुळसा**:—खरांच ! तूं जास मिन्ये पटकन् नी तिला ब्हाईर जाया सांग. (सौदामिनी जाते.)

**सौदामिनी**:—बरं. (जाते. चंदुलाल येतो.)

**चंदुलाल**:—काय तुळसाबाई तुम्ही आहांतच कां अजून ?

**तुळसा**:—हाय मंजी ? कुटलां खालचां वरचां बोलावनां नाय आलां मनां. अदुगर तुजां शराद् करीन तवा जाईन समादलास ? (सौदामिनी येते.)

**चंदुलाल**:—मंजिरी कुठें आहे ? (एक सिगारेट ओढतो.)

**सौदामिनी**:— ती गेली आत्तांच बाहेर.

**तुळसा**:—ती नाय आतां तुला गावायची चंद्या.

**चंदुलाल**:—कां पळवून नेली वाटतं कोणी ?

**तुळसा**:—तां काय पर असल.

**चंदुलाल**:—कोठल्याशा राजकुमारांबरोबर हिंडत असते ना ?

**सौदामिनी**:—बरीच माहिती दिसते तुम्हांला ?

**चंदुलाल**:—संभाळून रहा म्हणावं.

**तुळसा**:—तूं तिची काय पर कालजी करूं नुको. येकदा दूध पितांना तोंड भाजलां कीं, ताक पर फुकून पितां माजरूं. समादलास ?

**चंदुलालः**—हो, नाहींतर बडं घर आणि पोकळ वासा असायचा.

**सौदामिनीः**—तुमचं काय काम आहे ?

**चंदुलालः**—मंजिरीकडे होतं माझं काम.

**सौदामिनीः**—मग मी तिची खाजगी कारभारीण आहे. तेव्हां मला सांगितल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

**चंदुलालः**—( तुळसाकडे पहात ) ही पण असलीच पाहिजे का इथें ?

**सौदामिनीः**—हो. ती आमची दोघींची संरक्षक आहे. तेव्हां तीही असलीच पाहिजे.

**चंदुलालः**—अस्सं. तर मग मंजिरीचा काय विचार आहे तो समजून घेण्याकरतां मी आलों होतों.

**सौदामिनीः**—कांहीं असला तरी तुमचा काय संबंध तिच्याशीं ?

**चंदुलालः**—काय संबंध ? माझा कांहीं संबंध नव्हता तिच्याशीं ?

**सौदामिनीः**—तो संपला. आतां काय त्याचं ?

**चंदुलालः**—हें माहीत आहे का तिच्या नव्या स्नेह्यांना ?

**सौदामिनीः**—तें त्यांना माहीत असण्याची काय जरूर, आणि तें त्यांना माहीत आहे कीं नाहीं हें तुम्हांला कळण्याची काय जरूर ?

**तुळसाः**—गप बस मिन्ये. पुस्काल बडबडलीस. हये मांगाशीं वाद् काय घालीत बसत्येस ? चालता हो म्हून सांग त्येला.

**चंदुलालः**—ही भाषा वापरायची असली तर माझ्याशीं गांठ आहे. लक्षांत असूं दे.

**तुळसाः**—काय करनार हायस र ?

**चंदुलालः**—सांगेन सगळं जाऊन त्या राजकुमारांना. मंजिरीबरोबर

त्यांना आपलं नुसतंच राहयचं असेल तर ठीक आहे. पण जर का मंजि-रीच्या डोक्यांत अजून लग्नाचं वेड असलं तर त्यांना वेळींच सावध केलेलं बरं.

**तुळसाः**—लाज नाय वाटत हरामखोरा तुज्ये जिवाला, हतं येऊन दम भरतोस तो? तूंच तिला लगीन करायचा पहिल्यान् वचन देऊन मांगाहून फंशी पाल्डीस?

**चंदुलालः**—नायकिणीच्या पोरीशीं लग्न कोण करणार?

**सौदामिनीः**—मग करीन म्हणून खोटं वचन कां दिलंत?

**चंदुलालः**—कारण ती कबूल होईना त्याशिवाय.

**सौदामिनीः**—मग आतां काय पाहिजे तुम्हांला?

**चंदुलालः**—पूर्वी पाहिजे होतं तेंच आतां पाहिजे.

**तुळसाः**—वाट बघ आतां. धा येला लगीन करायचां म्हटलांस तरी नाय आतां चंद्या ती तुला गावनार.

**चंदुलालः**—कां, ठरलं वाटतं त्याच्याशीं लग्न? (दोघीही उत्तर देत नाहींत) मग मी लवकर जाऊन सांगतों त्याला तिची हकीकत.

**तुळसाः**—जा पगु जा. त्येच्येजवल येक अक्षार बोल त खरा. तुला कोर्टांत नाय खेचलां तर तुलसा कोलीन नवं मी.

**चंदुलालः**—मला कोर्टांत खेंचणार? कां म्हणून?

**सौदामिनीः**—त्यानीं काय केलं आहे तुळसा?

**तुळसाः**—ही काकाची विश्टेट आपल्ये घशांत कशी वोतलीस त्यें मनां ठावां नाय असा समजातायस व्होय?

**चंदुलालः**—काय आहे तुला माहीत?

**तुळसाः**— अदुगर खोटा कागाद क्येलास तयार. नी त्येवर काकाची खोटी सही तूं क्येलीस. बोल खरां आहे का नाय ?

**चंदुलालः**—खोटं अगदीं खोटं......आणि असलं खरं तरी पुरावा काय दाखवशील म्हातारे.

**तुळसाः**— अरं तरणीच्या, सांगत्ये ऐक. तुज्ये काकाची सही घटवीत व्हतास त्ये कागाद गावल हायत मना, समादलास ? त्ये दावीन नऊन वकीलाला, नी फरफटीत वोढीन तुला कोर्टांत, नी दवडीन तुरुंगांत, हायस कुटां ? जा सांग जाऊन मंजीची कहाणी. हरामजाद्या, तुजी शेंडी हाय माज्ये हातांत, ध्येनांत धर नी आतां हो चालता हतनां ( त्याच्या थोबाडींत मारते. ) नायतर लाथ बसल कमरत.

( चंदूलाल जातो. दुसऱ्या बाजूनें मंजिरी येऊन तुळसाला मिठी मारते व तिचे मुके घेऊं लागते ).

**तुळसाः**—अगो थोप. सोड मनां. नुको तरास देऊं मंज्ये. मेलीस ती. सोड, मनां पाडशील.

**मंजिरीः**— तूंच माझी आई शोभतेस, तुळसा.

**तुळसाः**— काय गो, तूं ब्हाईर ना ग्येली व्हतीस ? इक्त्यांत कशी आलीस परत ?

**मंजिरीः**— मी नव्हतें गेलें बाहेर. त्या खोलींतून ऐकत होतें तुमचं संभाषण. तुला कशी ग त्याची शेंडी सांपडली हातांत ?

**सौदामिनीः**— म्हणजे तुलाही माहीत नव्हतं हें त्याचं बिंग ?

**मंजिरीः**—छे. आत्ता कळलं.

**सौदामिनीः**— बरीच आहेस कीं ग तुळसा. मंजीलासुद्धां कळूं दिलं नाहींस ?

**तुळसाः**—येरींच गो कशाला सांगायचा. ती बडबडली असती कुटां तरी. तिला गप कुटां येताय् ऱ्हातां ? येल आली तवा सांगतलां.

**सौदामिनीः**—बरं झालं बाई, या दुष्टाचं तोंड लवकर बंद झालं. आतां याच्यापासून भीति नाहीं. बरं जातें मी आतां मंजे. वाचून पहा ती गोष्ट.

**मंजिरीः**—पाहीन ना. अग खरंच, सौदामिनी, जातांना तें चित्र घेऊन जा गडे दुकानांत आणि त्याला चौकट करायला सांग हं. काळी चौकट पाहिजे बरं का ?

**सौदामिनीः**—कुठलं चित्र ?

**मंजिरीः**—हें बघ. बघ ना. छान आहे कीं नाहीं ?

**सौदामिनीः**—( चित्र पहाते. तिचें तोंड उतरतें ) तुला कोणीं दिलं हें चित्र ?

**मंजिरीः**—राजकुमारांनीं दिलं, आणि काढलं पण त्यांनींच, बरं का. किती उत्तम चित्रकार आहेत नाहीं ?

**सौदामिनीः**—राजकुमारांनीं काढलं हें चित्र ?

**मंजिरीः**—अग हो. नुकतंच बंडगार्डनवर काढलं. बघ त्यांचं नांव-सुद्धां आहे कोपऱ्यांत.

**सौदामिनीः**—शरच्चंद्र आहे त्यांचं नांव ?

**मंजिरीः**—हो ना. ( नोकर येतो. )

**नोकरः**—राजकुमार शरच्चंद्र खालीं आले आहेत.

**मंजिरीः**—येऊं दे त्यांना वर. ( नोकर जातो. ) थांब कीं ग सौदा-मिनी. ओळख करून देतें तुझी.

**सौदामिनीः**—नको नको. मला जायचं आहे. ( चित्र घेऊन जाते. )

**मंजिरीः**—ए तुळसा, जरा आवर ग तो पसारा. ( पावडर लावते. केसांवरून फणी फिरवते आणि टेबलावर जाऊन सौदामिनीनें लिहून आणलेल्या गोष्टींत खाणाखुणा करूं लागते. शरद् हातांत एक भेंडोळें घेऊन येतो व तिच्या पाठीमागें थोडा वेळ उभा राहून डोळे झांकतो. )

**मंजिरी :**—असें डोळे झांकायचे असले म्हणजे आधीं आपण आल्याचं सांगून नसतं कांहीं पाठवायचं.

**शरद् :**—( डोळे सोडीत ) ठीक आहे. यापुढं ही सूचना अमलांत आणली जाईल. लेखन चाललं होतं वाटतं ?

**मंजिरी :**—थोडंसं.

**शरद् :**—पाहूं कां काय लिहिलं आहे तें ( गोष्ट घेतो ) ओ हो !

**मंजिरी :**—काय झालं ?

**शरद् :**—हें चित्र पहा म्हणजे समजेल काय झालं तें.

**मंजिरी :**—( चित्र उघडीत ) अगबाई, आपणही तेंच नांव दिलं आहे आपल्या चित्राला. काय योगायोग तरी.

**शरद् :**—योगायोग नाहीं हा. आपले विचार कसे तंतोतंत जुळतात याचं उदाहरण आहे हें.

**मंजिरी :**—कांहीं तरीच. प्रत्येक वेळेला थोडेच जुळणार आहेत.

**शरद् :**—कशावरून नाहीं ? सांगा पाहूं, आपण आपल्या पुढल्या गोष्टीचं काय नांव ठेवणार आहांत त्या ?

**मंजिरी :**— सांगितलं म्हणजे आपण म्हणणारच कीं चित्राचंही तेंच नांव योजलं होतं म्हणून.

**शरद्ः**—बरं तर मग, आपण दोघं चिठ्ठ्यांवर नांवं लिहूं नी पाहूं जुळतात का. कबूल ?

**मंजिरीः**—कबूल (त्याला एक कागद, पेन्सिल देते व आपण त्याच्याकडे पाठ करून चिठ्ठीवर लिहिते.) हं ही घ्या माझी चिठ्ठी.

**शरद्ः**—आणि ही घ्या माझी (दोघेंही एकमेकांच्या चिठ्ठ्या वाचतात.)

**शरद् व मंजिरीः**— अरे 'सामोरी'

**शरद्ः**—पाहिलंत? आतां तर पटलं? (तिचा हात हातांत घेतो.)

**मंजिरीः**— कांहीं तरी जादू केली आहे आपण माझ्यावर.

**शरद्ः**—माझीही बरोबर तीच तक्रार आहे.

(**चालः**–सुंदरि सीते जा भवनीं)

**जादूटोणा कां करुनी, घेसि झणीं, मन ओळखुनी।**

**मंजिरीः–मोहिनी घालुनि, हृदया भारुनि, मन्मन जाणुनी, घेसि गडे।**

**शरद्ः–** ,, ,, ,, ,,

**श. व मंः– जादूटोणा कां करुनी, घेसि झणीं, मन ओळखुनी।**

**मंजिरीः–अवचित जीवनिं, मम अवतरुनि, कोठुनि येउनि, बससि गडे।**

**शरद्ः–** ,, ,, ,, ,,

**श. व मंः– जादूटोणा कां करुनी, घेसि झणीं, मन ओळखुनी।**

**मंजिरीः–अविरत निंशिदिनीं, जागृति स्वप्नीं, स्फूर्ति देउनि, जासि गडे।**

**शरद्ः–** ,, ,, ,, ,,

**श. व मंः– जादूटोणा कां करुनी, घेसि झणीं, मन ओळखुनी।**

**मंजिरीः– प्रीतीबंधनिं, मज बांधोनी, गुलाम करुनी, घेसि गडे।**

**शरद्ः–** ,, ,, ,, ,,

**श. व मंः– जादूटोणा कां करुनी, घेसि झणीं, मन ओळखुनी।**

**शरद्:**— आपल्या गोष्टी एकत्र करून एक पुस्तक छापायचं होतं त्याचं काय झालं ?

**मंजिरी:**— आतां ही ' सामोरी ' लिहून झाली कीं करतें सुरवात.

**शरद्:**— या दासाची एक विनंति आहे.

**मंजिरी:**— ती आम्हाला मान्य आहे !

**शरद्:**— ती काय आहे हें कळण्याच्या आधींच मान्य केलीस ?

**मंजिरी:**— काय आहे हें समजल्यावर कोणीही मान्य करील. आधीं मान्य करण्यांतच गंमत आहे. शिवाय विनंति काय आहे हें मी थोडसं ओळखलंसुद्धां आहे.

**शरद्:**— चिठ्ठ्या लिहायच्या फिरून ?

**मंजिरी:**— इश्श, म्हणजे आतां उद्योगच नको दुसरा.

**शरद्:**— मग सांग काय ओळखलंस तें ?

**मंजिरी:**— प्रकाशनासंबंधीं आहे ना ?

**शरद्:**— ( तिचा हात हातांत घेऊन ) होय. अगदीं बरोबर. लेखिका:— प्रवासिनी, प्रकाशक:—शरच्चंद्र. जोडी चांगली आहे कीं नाहीं ?

**मंजिरी:**— ' शरच्चंद्रा ' कडे आणखीसुद्धां थोडसं काम येणार आहे.

**शरद्:**— कसलं बोवा ?

**मंजिरी:**— चित्र काढण्याचं.

**शरद्:**— वा जरूर जरूर. दर्शनी चित्र ना ? जरूर काढीन.

**मंजिरी:**— नुसत्या दर्शनी चित्रानें माझी भूक थोडीच भागणार आहे. शिवाय सगळं जग काढतं दर्शनी चित्रं. माझं पुस्तक जगाहून वेगळं दिसलं पाहिजे !

**शरद्ः**— मग काय आज्ञा आहे राणीसरकारांची ?

**मंजिरीः**– इश्श !

**शरद्ः**— आज्ञा कळूं दे ना ?

**मंजिरीः**— प्रत्येक गोष्टीमागें तिला जुळतील अशीं चित्रं काढलीं पाहिजेत....काम फार नाहीं ना होणार ?

**शरद्ः**— छे. मुळींच नाहीं. पण तुझी कल्पना मात्र मोठी बहारीची आहे. तुझ्या गोष्टी दे एकदां सगळया वाचायला म्हणजे त्याप्रमाणें चित्रं काढूं.

**मंजिरीः**— ठीक. आपलीही ' सामोरी ' एकदां दिसूं दे.

**शरद्ः**— दिसेल. लवकरच दिसेल. बरं. पुस्तकाचं नांव काय ठेवायचं ?

**मंजिरीः**— ' आगगाडींतील भेट. '

**शरद्ः**— वा ! फारच छान. आणि अर्पण कोणाला करायचं ?

**मंजिरीः**— तुळसाला. माझी दूधआई आहे ती.

**शरद्ः**— आणि माझी सासू. खरं ना ?

**मंजिरीः**— सगळया जगाचीच सासू आहे ती. मला तरी काय कमी सासुरवास करते ?

**शरद्ः**— एकूण माझ्या प्रश्नाला उत्तर द्यायचं मोठ्या शिताफीनं टाळलंस, होय ना ?

**मंजिरीः**— काय प्रश्न केला होता आपण ? असं कोडयांत बोलूं नये बाई.

**शरद्ः**— मग सरळ प्रश्न विचारूं कां ? पहा बरं. नकारार्थी उत्तर मला चालणार नाहीं.

**मंजिरीः**—मग प्रश्न कसला तो. आज्ञाच म्हटली पाहिजे ( हात जोडून ) राजकुमारांची काय आज्ञा आहे ?

**शरद्ः**—( तिचे दोन्ही हात हातांत घेऊन ) हीच आज्ञा. आपण एकमेकांचं पाणिग्रहण करावं हीच आज्ञा. बोल मान्य आहे का तुला ?

**मंजिरीः**—( हात सोडवते ) थोडा विचार नको का करायला ?

**शरद्ः**—आणि विचार करायला एकांत पाहिजे असेल.

**मंजिरीः**—मनकवड्या माणसापुढें काय बोलायचं बाई.

**शरद्ः**—बरं येतों मी. ( आंगठी काढून तिच्या हातांत घालतो. ) ही असूं दे जवळ माझी वकिली करायला. ( शरद् जातो. मंजिरी आंगठी-कडे पहाते व तिचें चुंबन घेते. पडदा )

## तिसरा अंक समाप्त.

# अंक चवथा

( **प्रवेश पहिला**—कमलिनीची खोली. जोडी, डंबेल्स पडलीं आहेत. कमलिनी शीर्षासन अथवा सर्वांगासन करीत असते. थोड्या वेळानें भाऊ येतो.)

**भाऊः**—कमलिनी, हें काय चाललं आहे तुझं ?

**कमलिनीः**—( आसन करीत असतांच ) करतें आहें जिवाची करमणूक.

**भाऊः**—कुठें सांपडलं तुला हें सगळं सामान ?

**कमलिनी**—इथेंच. तूं करीत असस ना पूर्वीं. आतां मी करतें इतकाच फरक. ( जोडी करूं लागते )

**भाऊः**—आतां वेड लागलं वाटतं पुरतं ?

**कमलिनीः**—लागलं आणि न लागलं. तूं तर सगळीकडे उठवलं आहेस ना मला वेड लागलं म्हणून ?

**भाऊः**—अग तें केवळ तुझ्या नवऱ्यानें तुला परत नेऊं नये म्हणून.

**कमलिनीः**—आणि नेलं त्यांनीं परत म्हणून तुझं काय जातं ?

**भाऊः**—काय म्हणजे ? त्या दिवशीं दारूच्या भरांत त्यानें तुला इतकी मारली. जीवच घेणार होता, तरी म्हणे माझं काय जातं.

**कमलिनीः**—अहाहा ! काय पण काळजी आपल्या बहिणीची ? त्यांनीं जिवे तरी मारली असती. तूं इथं मला जिवंत मरण भोगायला लावतो आहेस.

**भाऊः**—काय ग कमी आहे तुला ? पोटभर खायला मिळतं आहे, प्यायला मिळतं आहे. अंगभर नेसायला मिळतं आहे.

**कमलिनीः**—तूंच घालीत असशील जसा जेवायला. माझ्या नांवचे

साडेतीनशें रुपये येतात महिन्याच्या महिन्याला, माहीत आहे ना ? तूंच घेतोस ना मोजून ? त्यांतले राजा, माझ्या पायीं किती खरचतोस नी किती तूं उधळतोस सांग पाहूं ?

**भाऊः**— बरं बरं. फार बडबडायला लागलीस. तुला इथें काय कमी आहे तें सांग पाहूं ग ? उगीच कुरकुर करतेस ती.

**कमलिनीः**—काय नाहीं कमी ? मला कोठें जाऊं देत नाहींस. कोणाला माझ्याकडे येऊं देत नाहींस. कां, तर म्हणे मी वेडी !

**भाऊः**—रोज संध्याकाळीं फिरायला तर जातेस.

**कमलिनीः**— तें कसलं जळळं फिरायला जाणं ! ठरल्या ठिकाणीं जायचं नी ठरल्या वेळीं परत यायचं. कारण वेडी ना मी ! पुरती बंदिवासांत ठेवली आहेस मला. त्यापेक्षां वाटतं गेला असता प्राण तरी बरं झालं असतं.

**भाऊः**—( तिच्या पाठीवर हात ठेवीत ) छे छे, कमा, असलं कांहीं बोलूं नकोस हो. करूं तर त्याहून नकोस.

**कमलिनीः**— हो खरंच ! माझा प्राण गेला तर तुझी मिळकत कमी होईल नाहीं ? बरं बाबा. तुझ्याकडे बघून भोगतें झालं हें एकलकोंडं जिणं !

**भाऊः**— तूंच आपल्या कर्मानें तें एकलकोंडं करून घेतेस. तुझ्या सेवेला ठेवलेल्या बाईबरोबर तूं बोलतही नाहींस नीटपणें. त्याला कोण काय करणार ?

**कमलिनीः**— ऐका ! म्हणे माझ्या सेवेला ठेवलेली बाई ! तिच्यापुढें तुरुंगावरचा एकादा खाष्ट पहारेकरी सुद्धां पुरवला आणि तुझ्या या बंदि-वासापुढें शपथ सांगते त्यांची मारहाणही पुरवली.

**भाऊः**—हो कां ? आणि त्यांचे नाच तमाशे ?

**कमलिनी:**—नाच तमाशे तूं काय कमी करतोस ? सगळे पुरुष सारखेच. उद्योगाविना पैसा हातीं आला कीं, हे ढंग सुचायचेच.

**भाऊः**—मग आतां कां कुरकुरतेस ? आतां तर एकसुद्धां पुरुष दृष्टीस पडत नाहीं ना ?

**कमलिनी:**—जगच दृष्टीस पडूं देत नाहींस, तर पुरुष कोठून दिसतील नी बायका तरी कोठून दिसतील ? हा बंदिवास भोगायला काय पाप केलं होतं गेल्या जन्मीं परमेश्वर जाणे !

**भाऊः**—बंदिवास ! तुरुंग ! पहारेकरी ! बडबड तूं आपली. खरोखरीचा तुरुंग पाहिला नाहींस म्हणून. तरी बरं, नवा बोलपट गांवांत आला कीं, सबंध बॉक्स घेतों तुझ्याकरतां.

**कमलिनी:**—हो हो आहे माहीत ! भारी कळकळ वाटते बहिणीची म्हणूनच घेत असशील जसा ! माझ्यावर नीट नजर ठेवतां यावी आणि मी खरोखरची वेडी नाहीं हें कुणाला कळूं नये म्हणून घेतोस सगळी बॉक्स समजलास. मी अगदीं बोळ्यानं दूध पिते असं समजूं नकोस.

**भाऊः**—फोड माझ्या नांवानं खडे. नवऱ्याच्या तावडींतून चांगली सोडवली तें राहिलं बाजूला आणि आपली मलाच बोलून घेतेस. ज्याचं करायला जावं बरं तें म्हणतं माझंच खरं. त्या हरामखोर नवऱ्याकडेच पाठवायला हवी तुला म्हणजे समजेल.

**कमलिनी:**—तर मग पाठवच बघूं रे.

**भाऊः**—पाठवच म्हणे ! तो अगदीं तुझीच वाट बघत बसला आहे जसा. एव्हाना त्याचीं छप्पन लफडीं झालीं असतील. आतां तर लग्नसुद्धां करणार आहे म्हणे.

**कमलिनी:**—( आश्चर्यानें ) लग्न करणार आहेत ? कोणाशीं ?

**भाऊः**—आहे एक कोणशीशी नायकिणीची पोर.

**कमलिनीः**—नायकिणीच्या मुलीशीं लग्न करणार आहेत ?

**भाऊः**—असं ऐकतों बुवा.

**कमलिनीः**—कोणी सांगितलं तुला ?

**भाऊः**—आहे एक माझा मित्र, शेट चंदूलाल नांवाचा, त्यानें सांगितलं. काय उमदा माणूस आहे कमलिनी.

**कमलिनीः**—कुठें आहेत ते सध्यां ?

**भाऊः**—चंदूलाल ना ? तो आहे मुंबईत.

**कमलिनीः**—चंदूलाल गेला चुलींत. हे कुठें आहेत ?

**भाऊः**—हे ? असं असं. आमचे मेव्हणे वाटतं ?

**कमलिनीः**—होय तेच. कुठें आहेत ते सध्यां ?

**भाऊः**—गेला आहे पुण्याला त्या पोरीबरोबर. तिथेंच लग्नाविघ्न उरकून टाकील झालं. इथें कोणी मुलगी देईना त्याला. तेव्हां गांठलीन् झालं जी मिळाली ती.

**कमलिनीः**—( विचार करीत ) हं. येथपर्यंत मजल येऊन पोंचली म्हणायची.

**भाऊः**—तुला काय करायचं आहे आतां त्याच्याशीं ? मरूं दे शिंच्याला. त्यानें तुझा नाद सोडला. तूंही आतां त्याचा नाद सोड.

**कमलिनीः**—तूं मला धरूं कुठें देतो आहेस कुणाचा नाद ?

**भाऊः**—कां नाहीं देणार ? मदतसुद्धां करीन. तूं शहाणी हो जरा.

**कमलिनीः**—शहाणी ना ? तूं होऊं देशील तेव्हां होईन. वेडी म्हणून तूंच शिक्का मारलास. तो पुसला जाऊन शहाणी हा शिक्का बसेल तेव्हां मी शहाणी होणार.

**भाऊः**—तूं नीट वागणार असशील कमलिनी, तर त्याला ग काय उशीर? मी त्या चंदूलाललाच घरीं राहयला बोलावणार आहें. त्याची ओळख करून देतों तुझी.

**कमलिनीः**—अस्सं. आतां मला हे धंदे करायला लावणार आहेस वाटतं?

**भाऊः**—अग खूप श्रीमंत आहे तो. पण बिचाऱ्याच्या बायकोला लागलं आहे वेड.

**कमलिनीः**—वेड? खरं वेड कीं खोटं वेड?

**भाऊः**—मी मुळीं बोलतच नाहीं तुझ्याशीं.

**कमलिनीः**—अरे एकदां एक युक्ति सफल झाली कीं प्रत्येक वेळीं तीच तीच युक्ति योजूं नये माणसानं. युक्त्यासुद्धां बदलाव्या लागतात बरं भाऊराया.

**भाऊः**—जातो मी आपला. तुला आपलं हित केव्हां कळेल तें कळो. (जातो. दाराला कुलूप घातल्याचा कानोसा घेते व नंतर उठून जोडी करूं लागते.)

---

(**प्रवेश दुसरा**—बंडगार्डन, मेघदूत घोड्यावर कोरा कागद लावून पुष्कळ वेळ अस्वस्थ चित्तानें इकडून तिकडे हिंडत असतो. कांहीं वेळानें सौदामिनी येते. ती फुगलेलीच असते.)

**मेघदूतः**—किती उशीर केलात यायला?

**सौदामिनीः**—अरेरे, फार क्लेश झाले महाराजांना!

**मेघदूतः**—खोटं नाहीं, खरोखरीच झाले.

**सौदामिनीः**—पूर्वीं असं कोणी तिष्ठत ठेवलं नसेल श्रीमंतांना?

**मेघदूतः**—( हंसत ) खरी गोष्ट आहे. बरं. झाली तुमची गोष्ट लिहून ?

**सौदामिनीः**—झाली महाराज.

**मेघदूतः**—माझं चित्रही पण पुरं झालं.

**सौदामिनीः**—तें कळलं मला सरकार.

**मेघदूतः**—कळलं ? का ओळखलं ?

**सौदामिनीः**—ओळखलं नाहीं. कळलं महाराजसरकार. तें दिव्य चित्र मीं पाहिलंसुद्धां.

**मेघदूत**ः—तें दिव्य चित्र पाहिलंसुद्धां ? म्हणजे काल तुम्हीं जें या सुंदर हातांनीं टरकावलंत तेंच ना ?

**सौदामिनी**ः—तें नाहीं महाराज. श्रीमंतांनीं फिरून जें काढलं तें पाहिलं.

**मेघदूत**ः—तें कसं बुवा तुमच्या दृष्टीस पडलं ?

**सौदामिनी**ः—पडलं असंच. थोर लोकांच्या कलाकृति कुठें अशा लपून कां राहतात सरकार ?

**मेघदूत**ः—ओ हो ! केवढे थोर लोक आम्ही ?

**सौदामिनी**ः—हें काय बोलणं महाराज ? श्रीमंत राजकुमारांच्या बहुमोल चित्राला आतांच मी चौकट करायला टाकून आलें. सरकारांना ती पसंत पडेल अशी आशा आहे.

**मेघदूत**ः—( गोंधळून ) राजकुमारांचं चित्र ?

**सौदामिनी**ः—होय सरकार. महाराजांना तें परवां पहायला मिळेल.

**मेघदूत**ः—महाराज ? सरकार ? श्रीमंत ? राजकुमार ? हें आरंभलं आहे तरी काय तुम्ही ? कोण श्रीमंत, कोण राजकुमार, कोण महाराज आणि कोण सरकार ?

**सौदामिनी**:—श्रीमंत राजकुमार शरच्चंद्र महाराज सरकार. अद्याप आपली स्वतःची ओळख नाहीं पटली सरकारना ?

**मेघदूत**:— असं. असं. असं. शरद् होय ?

**सौदामिनी**:— माझ्यासारख्या सामान्य जनांना श्रीमंतांचं असं एकेरी नांव ऐकणं म्हणजेसुद्धां पाप वाटतं.

**मेघदूत**:— बरं, बरं. त्या पापापुण्याचा आपण लवकरच समाचार घेऊं हं. पण बाईसाहेब, तें चित्र तुम्हीं कोठें पाहिलंत तेवढं सांगाल का जरा ?

**सौदामिनी**:— सरकार स्वारींनीं जिला तें प्रेमानं नजर केलं तिच्याकडेच पाहिलं महाराज.

**मेघदूत**:— अस्सं. त्या छत्रीवाली, गळपट्टावाली, रुमालवालीकडे ना ?

**सौदामिनी**:— श्रीमंतांचीं प्रेमाचीं विशेषणं आम्हा दासीजनानां कशीं कळावीं सरकार ?

**मेघदूत**:— आतां काय करावं ? बयाचं नांवही सांगितलं नाहींन् बेट्यानं. अहो ती त्याला आगगाडींत भेटली तीच ना ?

**सौदामिनी**:— उभयतां स्वाऱ्यांची भेट प्रथम आगगाडींत झाली ही गोष्ट सत्य आहे. राजकुमार त्यावेळीं नेरळला उतरले.

**मेघदूत**:— बरं ती तुमची कोण ?

**सौदामिनी**:— ती माझी मैत्रीण होती. आतां मालकिणीचं नातं आहे. श्रीमंतांची काय आज्ञा आहे ?

**मेघदूत**:— ( हात जोडून ) आतां पुरे करा तुमचे श्रीमंत, महाराज, आणि सरकार. कान किटायची वेळ आली. हें पहा, माझं नांव आहे साधंसुधं मेघदूत घारपुरे. आणि तुमचा श्रीमंत राजकुमार इत्यादि इत्यादि जो आहे ना, तो आहे माझा मित्र शरद्.

**सौदामिनीः**—म्हणजे चित्रकार शरच्चंद्र ना?

**मेघदूतः**—( डोकें खाजवीत ) अरे तिच्या! हें लचांड आहेच, नाहीं कां? आतां काय करावं बोवा? सांगावं तरी पंचाईत न सांगावं तरी पंचाईत.

**सौदामिनीः**—माझ्यासारख्या मूढ दासीला कळलं नाहीं तरी चालेल. श्रीमंतांनीं व्यर्थ जिवाला त्रास करून घेऊं नये.

**मेघदूतः**—मेहरबानी करून आतां बस्स कराल कां? ऐका आतां. सगळं कोडं सोडवितों. खरा चित्रकार मी. उसना चित्रकार तो. त्या तुमच्या मैत्रिणीजवळ त्यानें मारली थाप आपण चित्रकार असल्याची. तेव्हां आतां तें नाटक चालूं ठेवण्यासाठीं मला त्याचीं चित्रं काढावीं लागतात. दुसरं काय? झालं? उलगडलं सगळं कोडं?

**सौदामिनीः**—म्हणजे तुम्ही राजकुमार शरच्चंद्र नव्हेत?

**मेघदूतः**—नाहीं. नाहीं. नाहीं. मी मेघदूत घारपुरे. एका साध्या पोस्टमास्तरचा मुलगा.

**सौदामिनीः**—मग ही धडधडीत लुच्चेगिरी आहे तुमच्या मित्राची.

**मेघदूतः**—लुच्चेगिरी कशी? मला जर त्यानें सांगून सवरून सगळं केलं तर लुच्चेगिरी कुठें राहिली त्यांत? प्रामाणिकपणाच म्हटला पाहिजे याला. शिवाय चित्रामागें मला चांगले पैसेही देतो बिचारा.

**सौदामिनीः**—पण तिच्याजवळ नाहीं कां त्यानें लुच्चेगिरी केली?

**मेघदूतः**—अहो तें चालायचेंच. तीही त्याच्याजवळून कांहीं चोरून ठेवीत नसेल कशावरून? दुसऱ्याच्या भानगडींत आपण कशाला पडा? ज्याचं पाप त्याच्याजवळ. बरं, झाला आतां श्रीमंत महाराज राजकुमार सरकारांच्या पापापुण्याचा बरोबर हिशोब? का राहिला आहे कांहीं शिल्लक?

**सौदामिनीः**—इश्श. पुरे आतां तो विषय.

**मेघदूत**:—काय नुसतं भंडावून सोडलं होतं ! श्रीमंत काय, नी महाराज काय, नी सरकार काय, मोठे लोक काय, सामान्य जन काय, मूढ दासी काय, छे छे छे छे. हुश्श. पांढरे झाले असतील माझे केस.

**सौदामिनी**:—पुरे आतां. मी हात जोडतें.

**मेघदूत**:—बरं पण बाईसाहेब, अंधार पडत चालला. आपली सामोरी कशी काढणार आतां ?... चला, खोलीवर येतां कां माझ्या ?

**सौदामिनी**:—नको. खोलीवर नको.

**मेघदूत**:—हो खरंच, असाच कांहींतरी बहाणा करून हल्लीं पळवून नेतात नाहीं कां बायकांना ? पण तुम्ही कांहीं फसणार नाहीं.

**सौदामिनी**:—आतां पहा हं ! अशानीं मी बोलणारच नाहीं. सारखं किती चिडवायचं माणसाला ?

**मेघदूत**:— तर मग खोलीवर चला म्हणजे नाहीं चिडवणार.

**सौदामिनी**:— आलें असतें. पण आतां म्हटलं ‘ सामोरी ’चा प्रयोग माझ्यावर न केलेलाच बरा.

**मेघदूत**:— तो कां म्हणून ?

**सौदामिनी**:— कारण असं पहा. चित्र काढणार तुम्ही आणि देणार आपल्या मित्राला...होय कीं नाहीं ? आणि आपले स्नेही ते आपलं म्हणून देणार माझ्या मैत्रिणीला; तेव्हां तें माझं नसलेलं बरं नव्हे कां ? अं ? काय म्हणतें मी ?

**मेघदूत**:— हो बुवा. खरी गोष्ट आहे. इतका खोल विचार बायकाच करूं जाणोत. आम्हां पुरुषांना तें कसचं साधतं आहे.

**सौदामिनी**:— निदान सांगितल्यावर तरी समजतं आहे हें काय थोडं झालं ?

**मेघदूतः**— एकूण माझ्या खोलीवर यायचं मोठ्या शिताफीनं टाळलंत, होय ना?

**सौदामिनीः**— इथें हवा इतकी सुंदर असतां घरीं कशाला जायचं कुणाच्या.

**मेघदूतः**— अरे हो. तुम्ही आज बरोबर आपलं कांहीं लिखाण आणायचं कबूल केलं होतं नाहीं कां? आणा पाहूं कुठें आहे तें...कां विसरलांत?

**सौदामिनीः**— अं...आणलं होतं, पण आमची स्वारी श्रीमंतांवर इतकी गरम झाली होती कीं त्या कोपाच्या वणव्यांत तें जळून खाक झालं.

**मेघदूतः**— असं होय? मग आतां आम्हांला आपलं नांव तरी सांगितलं पाहिजे म्हणजे आम्हीच तें गोळा करून वाचूं.

**सौदामिनीः**— इतकं कांहीं अगदीं ढीगभर नाहीं गोळा करायला.

**मेघदूतः**— ढीगभर नाहीं! चिमूटभर आहे. पण नांव तर सांगाल कीं नाहीं.

**सौदामिनीः**— प्रवासिनी ह्या नांवावर लिहितें मी.

**मेघदूतः**— प्रवासिनी?...तरीच...कालची कविता ऐकून मला संशय आलाच होता.

**सौदामिनीः**— हो! कांहीं तरीच.

**मेघदूतः**— खोटं नाहीं, प्रवासिनी महाराज! बरेच दिवसांपासून आम्ही आपल्याला ओळखतों, बरं बाईसाहेब.

**सौदामिनीः**— जसं कांहीं खरंच वाटेल कुणाला. दिली ठोकून आपली एक थाप झालं.

**मेघदूतः**— शपथ थाप नाहीं. खरंच सांगतों.

**सौदामिनीः**—मग सांगा पाहूं माझ्या एका तरी गोष्टीचं नांव ?

**मेघदूतः**—सांगू ? 'रिकामें हृदय' 'वाळवंटांतील फूल' 'जागेपणचें स्वप्न' 'स्वप्नांतील भांडण' पुरे ?

**सौदामिनीः**—हो पुरे.

**मेघदूतः**—अहो एवढ्यानेंच काय झालं. तुमच्या कवितांचीं नांवंसुद्धां मी सांगूं शकेन. 'धबधबा' 'घड्याळ' 'कोळसेवाला' "तारवाला"

**सौदामिनीः**—पुरे पुरे आतां...नाहींतर मला एकदम 'ग' ची फार बाधा होईल बरं का.

**मेघदूतः**—आणि तुमची 'भिकारीण' ही कविता तर मला इतकी आवडली कीं, मीं त्या दृश्याचं एक चित्र सुद्धां काढलं आहे.

**सौदामिनीः**—आम्हांला दाखवलं पाहिजे तें चित्र.

**मेघदूतः**—दाखवीन ना. पण पहायला खोलीवर आलं पाहिजे.

**सौदामिनीः**—हं ! ... हरदासाची कथा मूळपदावर.

**मेघदूतः**—अर्थात्. मग चलतां आतां ?

**सौदामिनीः**—छे बाई. किती उशीर झाला आहे आतां. शिवाय भूक कोण लागली आहे.

**मेघदूतः**—अरे हो. बरी आठवण केलीत. तुम्ही सुरवातीला केलेल्या सरबत्तींत मी पार विसरूनच गेलों. बरोबर पुऱ्या, बटाट्याची भाजी आणि केळीं आणलीं आहेत.

**सौदामिनीः**—अरे वा ! पुरुष आतां जेवण्याखाण्याची व्यवस्था पाहूं लागले कीं, मग काय चैन आहे आम्हां बायकांची आणि काय ?

**मेघदूतः**—करणार काय ? बायका पुरुषांचीं कामं करूं लागल्या मग पुरुषांना नकोत का बायकांचीं कामं करायला. हं. घ्या करा सुरवात.

**सौदामिनीः**—वदनिं कवळ घेतां नाम घ्या श्रीहरीचें
सहज हवन होतें नाम घेतां फुकाचें
जिवन करीं जिवित्वा अन्न हें पूर्ण ब्रह्म
उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म

( नमस्कार करून खाऊं लागतात )

**मेघदूतः**—मग उद्यां केव्हांशी येणार खोलीवर ?

**सौदामिनीः**—राहतां कुठेशी ?

**मेघदूतः**—सोट्या म्हसोबाजवळ.

**सौदामिनीः**—केव्हांशी असतां घरीं ?

**मेघदूतः**—तुम्ही सांगाल त्या वेळीं हजर राहीन. नाहीतर असं करतों उद्यां मुळीं हलतच नाहीं खोलींतून. तुम्हांला सवड होईल तेव्हां या. मात्र या हं.

**सौदामिनीः**—तुमच्या स्नेह्यांच्या कामांत व्यत्यय नाहीं ना येणार ?

**मेघदूतः**—छट्. चोवीस तास भारीच करतों आहें मी त्याचं काम.

**सौदामिनीः**—बरीच जुनी ओळख दिसते तुमची.

**मेघदूतः**—हो ना. शाळेपासून. आम्ही दोघे वऱ्हाडचे. कॉलेजांत मात्र पुण्याच्या आलों. कीर्ति ऐकली होती फार !

**सौदामिनीः**—म्हणजे राजकुमार शिकलेले आहेत तर ? नुसतेच संस्थानिक नाहींत.

**मेघदूतः**—आम्ही बरोबरच इंटर झालों. पुढें मला ही बुद्धि होऊन मी आर्ट स्कूलमध्यें गेलों आणि तो बी. ए. झाला.

**सौदामिनीः**—वागायला कसे आहेत हो ? लबाड असावेत नाहीं ?

**मेघदूतः**—हो. आहे थोडासा लबाड. पण त्याची लबाडी अगदीं सरळ असते. लहान मुलांनेंही ओळखावी.

**सौदामिनीः**—अस्सं. आणि सांपत्तिक स्थिति कशी काय आहे श्रीमंतांची? कर्ज बिर्ज भरपूर?

**मेघदूतः**—तसलं कांहीं एक नाहीं हो. कर्ज नाहीं. कोर्ट ऑफ वार्ड्स नाहीं, कांहीं नाहीं.

**सौदामिनीः**—अरे वा! म्हणजे अगदीं नमुनेदार संस्थानिकच आहेत म्हणायचे. मग आपल्या श्रीमंतांची ऐट असेल पुष्कळ?

**मेघदूतः**—छे. मुळींच नाहीं. उलट त्याला जरा चीडच आहे त्या तिऱ्हाईत पद्धतीच्या वागण्याची. म्हणून तो वऱ्हाडांत राहतही नाहीं फारसा. इकडेच मोकळं वाटतं त्याला. अगदीं साधा माणूस आहे तो. मला तर तो संस्थानिक आहे याची कधीं आठणवसुद्धां राहात नाहीं. असं कोणीं सांगावं तेव्हां लक्षांत येतं.

**सौदामिनीः**—व्यसनी बिसनी नाहींत ना?

**मेघदूतः**—पण काय हो? फारशी चवकशी चालवली आहे तुम्हीं? कांहीं डाव आहे वाटतं आपला?

**सौदामिनीः**—माझा डाव? माझा डाव सगळा कागदावर. हातीं लेखणी आणि पुढें कागद.

**मेघदूतः**—(पोटावरून हात फिरवीत) भारी पोट भरलं बुवा. "आतापी भक्षितो येन"...पुढें काय हो?

**सौदामिनीः**—'वातापी च महाबलः। अगस्त्यस्य प्रसादेन भोजनम् तव जीर्यताम् ॥'

**मेघदूतः**—आतां असं वाटतं कीं पाय पसरून गाई गाई करावी.

(पाय लांब करून डोकें बांकावर टेकतो)

**सौदामिनीः**—आणखी नाहीं का कांहीं वाटत ?

**मेघदूतः**—हो वाटतं ना. तुम्ही अंगाई म्हणत मला थोपटावं असं.

**सौदामिनी**—इश्श.

**मेघदूतः**—( एकदम उठून ) खरंच तुमची अंगाई म्हणून एक कविता आहे.

**सौदामिनीः**—आहे खरी. माझ्या भाचीच्या बारशाला केली होती.

**मेघदूतः**—मग म्हणा कीं ती.

**सौदामिनीः**—इथें पहावं तर भाचीही नाहीं नी बारसंही नाहीं.

**मेघदूतः**—मग दुसरी एक तट्ट फुगलेल्या तरुणावर करा.

**सौदामिनीः**—अहाहा ! काय स्फूर्तिदायक विषय आहे पण.

**मेघदूतः**—मग भाचीच्या बारशाला केलेलीच म्हणा. एरवीं आम्ही जाऊंच देणार नाहीं.

**सौदामिनीः**—

( **चालः**— चींवचींव ग चिमणी आई )

**रानावनांत निर्झर गाई। नीज सोनुले नीज अंगाई।**
**जो जो ग जो जो॥**

**पूर्णिमे चंद्रा लागे ग्रहण। तुझें वदन दिसे कां म्लान।**
**जो जो ग जो जो॥**

**शेत हिरवें दंव त्यावर। तुझ्या नयनीं अश्रूंचे पूर।**
**जो जो ग जो जो॥**

**माझी चमेली कोणी पाहिली। कोणा दुष्टाची दृष्ट लागली।**
**जो जो ग जो जो॥**

**गाणें गुंगत पाजीते आई। घेइ विसावा नीज अंगाई।**
**जो जो ग जो जो॥**

वीज विराजे झणीं लकाके। तेज तियेचें मुखिं झळके।
जो जो ग जो जो ॥

हिरे माणिक मोत्यांचे हार। बाळाचे गळा शोभती फार।
जो जो ग जो जो ॥

आकाशामध्यें तारे हांसती। बाळ बागडे त्यांच्या संगती।
जो जो ग जो जो।

चांदण्यामध्यें हिंडे स्वच्छंदी। नाच सारखी बाळ आनंदी।
जो जो ग जो जो।

कोण हांसलें तेज फांकत। कुंदाच्या कळया बाळाचे दांत।
जो जो ग जो जो ॥

पाना आडूनी फुलें बघती। गालीं गुलाब तुझ्या खेळती।
जो जो ग जो जो ॥

राणी राजाचीं रत्नें सांडलीं। बाळलोचनीं चमकूं लागलीं।
जो जो ग जो जो ॥

नभीं विलसे चांदोबाराया। अर्धचंद्रिका बाळभिंवया।
जो जो ग जो जो ॥

उडे बागडे माझी हरिणी। जरा आराम घेई साजणी।
जो जो ग जो जो ॥

खेळ खेळूनी बाळ दमली। गाणें ऐकत स्वस्थ निजली।
जो जो ग जो जो ॥

( मेघदूतला झोंप लागते. सौदामिनी हळूच उठून निघून जाते. मेघदूत घोरूं लागतो. थोड्या वेळानें शरद् येतो. )

**शरद्**:—( मेघदूतकडे पाहून ) येऽ! छान काम चाललं आहे आणि हें काय?...अरे फराळाचा डबा. ( उघडतो ) च्यायला. ठणठणीत रिकामा!

...ए कुम्भकर्णा ! ऊठ. ( मेघदूतला हलवतो. मेघदूत या कुशीचा त्या कुशीला होतो. )

**मेघदूत**:—( झोपेंतच )...जो जो ग जो जो...काय गोड वाटतं ! म्हणा ना आणखी एकदां...जो जो ग जो जो.

**शरद्**:—अँ ? जो जो ग जो जो. फिरून म्हणा ? कोण गाढवीचा इथें तुला थोपटून गाणं म्हणतो आहे रे म्हसोबा ? ऊठ.

**मेघदूत**:—( उठून डोळे चोळीत ) तूं होय ?... मी कुठं आहें ? आणि ती सुंदरी कुठें गेली ?

**शरद्**:—कुठली आली आहे सुंदरी ? आणि असा त्या सौभद्रांतल्या सुभद्रेसारखा काय बडबडतो आहेस ? इथें सुंदरीबिंदरी कोणी नाहीं महा-राज. आमची खाशी स्वारी तेवढी आहे.

**मेघदूत**:—तें दिसतंच आहे.

**शरद्**:—काय काम केलंस आज ? ( घोड्याकडे जाऊन ) हें रे काय फद्या ? कांहींच केलं नाहींस. कागद अगदीं कोरा करकरीत आहे.

**मेघदूत**:—हो झालं खरं बुवा असं.

**शरद्**:—मी तर मुद्दाम आज तुझ्या 'सामोरी'ची सुरवात पहायला इकडे आलों.

**मेघदूत**:—'सामोरी'ची सुरवात ? गड्या, नको आतां 'सामोरी'. राहूंदे तिला पाठमोरीच.

**शरद्**:—वा ! तें कांहीं चालणार नाहीं. मी तर तिला लवकर चित्र आणून देतों म्हणून कबूलसुद्धां केलं आहे.

**मेघदूत**:—कुणाला, त्या रुमालवालीला ?

शरद्:—हो.

मेघदूतः—मग असं कर ना शरद्, तिलाच बसव ना एकदां सामोरी.

शरद्:— शाबास पठ्ठे ! तुझं डोकं मोठं सुपीक आहे बोवा. माझ्या डोक्यांत रे कशा नाहीं अशा सुंदर कल्पना येत ? ठीक, तिचीच सामोरी काढूं. शुभस्य शीघ्रम्. ...उद्यांच बोलावतों तिला... ( विचार करीत )... अरे पण तें जमायचं कसं रे ?

मेघदूतः— जमायचं आहे काय त्यांत ?

शरद्:— काय म्हणजे ? अरे चित्रकार आहें मी ! तूं नव्हे. विसरलास वाटतं ? तिच्या आयची कटकट !

मेघदूतः— हो रे हो. बरं लवकर लक्षांत आलं तुझ्या.

शरद्:— मग कसं करायचं रे ?

मेघदूत— कसं काय करायचं आहे ? तिचं चित्र काढायचं नाहीं झालं. दुसरी आणूं कुणी तरी सामोरी.

शरद्:— नाहीं नाहीं. आतां चित्र काढायचं तें तिचंच. एकदां ठरलं तें ठरलं.

मेघदूतः—मग काय मला तुझा वेष घ्यायला सांगणार आहेस कीं काय ?

शरद्:—वाट बघ लेका. माझा वेष घ्यायला सांगतों आहे ! ... तुला तिच्या दृष्टीससुद्धां पडूं देणार नाहीं...मग कसं बरं करावं ( विचार करतो. चुटकी वाजवितो ) बस्स ठरलं. असंच करायचं.

मेघदूतः—हं बोला, बृहस्पते ! सांगा काय काय करायचं तें.

शरद्:—तें सगळं मी उद्यां तुझ्या खोलीवर येऊन सांगतों मित्रा. तूं

तुझी खोली तेवढी झक्क झाडूनपुसून ठेव. आमच्या भावी राणीसाहेब तिथें येणार आहेत, लक्षांत ठेव हं !

**मेघदूतः**—ओ हो हो ! येथपर्यंत आलं का प्रकरण ? मग आतां आम्हाला नांव तरी सांगा कीं वहिनींचं, रुमालवाली, रुमालवाली किती दिवस म्हणणार ?

**शरद्ः**—तिचं नांव प्रवासिनी.

**मेघदूतः**—( आवंढा गिळून ) काय ? प्रवासिनी ?...आणि आडनांव काय प्रवासिनीचं ?

**शरद्ः**—आडनांव ? वेड्या अगदींच अरसिक आहेस. लेखिकेच्या नांवाला कुठें आडनांव असतं वाटतं ?

**मेघदूतः**—लेखिका ? लेखिका आहे ती ?

**शरद्ः**—आहे म्हणजे ? उत्कृष्ट लेखिका आहे ती. ह्या बघ तिच्या गोष्टी. 'रिकामें हृदय' 'वाळवंटांतील फूल' 'जागेपणचें स्वप्न' 'स्वप्नांतील भांडण' आणि हो, हें बघ प्रत्येक गोष्ट वाचून त्या गोष्टीला जुळतील अशीं चित्रं काढ. कारण त्या सर्व गोष्टी एकत्र करून एक सचित्र पुस्तक छापायचं आहे, समजलास. लेखिका प्रवासिनी, चित्रकार शरच्चंद्र. आहे कीं नाहीं नामी जोडी ? हं. ह्या घे, वाचून काढ सगळ्या गोष्टी.

**मेघदूतः**—( खिन्नपणें ) वाचल्या आहेत मीं त्या.

**शरद्ः**—होय ना ? पाहिलीस ना लेखणी कशी चालते ती ? मी किती भाग्यवान् आहें मित्रा ! त्रिखंड शोधून काढलं असतं तरी अशी मुलगी मिळाली नसती.

( **चालः**—सांवळा वर बरा )

**त्रिभुवनीं धुंडुनी चतुर अशि कामिनी ।**
**नाहिं मिळणारची सकलगुणधारिणी ।**

**रूप तारुण्यविद्या त्रिवेणी अशा।**
**संगमीं पोहते हृदयराणी। त्रिभुवनीं ...**

**गोष्टि कविता तशा लिहितसे नाटिका।**
**दिव्य प्रतिभा जिची तीच गृहिणी। त्रिभुवनीं...**

( मेघदूत डोकें हातांत धरून बसतो. )

काय रे झोंप आली वाटतं फिरून? जा आतां घरीं जा महाराज. आणि उद्यांची नीट व्यवस्था ठेवा. ( मेघदूत खिन्नपणें जातो. पडदा )

## चवथा अंक समाप्त.

# अंक पांचवा

( **प्रवेश पहिला**—मेघदूतची खोली. दोन फुलदाण्यांतून फुलें वगैरे भरून ठेवलीं आहेत. घोड्यावर लावलेल्या कागदावर मेघदूत काळा रंग फांसतो आहे. सौदामिनी येते.)

**सौंदामिनीः**—येऊं का आंत ?

**मेघदूतः**—( उपहासानें ) नको म्हणून कसं चालेल?......एकट्याच आलांत ?

**सौदामिनी**—दुकटं इथेंच भेटायचं होतं म्हणून एकटी आलें.

**मेघदूतः**—असं होय ? मग बसा तिथें श्रीमंतांची वाट पहात.

**सौदामिनीः**—काल पोटभर झोप मिळालेली दिसत नाहीं. मी गेलें तेव्हां तर सुखस्वप्नं पडत असल्याचा भास होत होता.

**मेघदूतः**—काल ? कुठें . . हं . . सुखस्वप्नं ! होतीं खरीं स्वप्नंच. आतां मात्र खडखडीत जागा झालों. ( आणखी काळा रंग फांसतो. )

**सौदामिनीः**—हें कसलं चित्र काढणं चाललं आहे ? आधुनिक कलेचा एखादा प्रकार आहे वाटतं ?

**मेघदूतः**—हो. विश्वग्रहण आहे हें. पाहिलंत.

**सौदामिनीः**—हो पाहिलं. पण काल कबूल केलेलं चित्र दाखवा कीं आम्हांला. तें भिकारणीचं.

**मेघदूतः**—इतकी घाई कशाला ? आतां दिसतीलच कीं सगळीं चित्रं आपोआप. सचित्र ग्रंथ निघायचा आहे ना ?

**सौदामिनीः**—सचित्र ग्रंथ ? कसला सचित्र ग्रंथ ?

**मेघदूतः**——उभयतां सरकारस्वाऱ्यांच्या कलाकृतींचा !

**सौदामिनीः**——उभयतां सरकार स्वाऱ्यांच्या कलाकृतींचा !!

**मेघदूतः**——जसं कांहीं गांवींच नाहीं. प्रवासिनीचं लिखाण आणि शरच्चंद्राचीं चित्रं असा अपूर्व योगायोग होणार आहे ना त्या ग्रंथांत ?

**सौदामिनीः**——कुणीं सांगितलं हें तुम्हांला ?

**मेघदूतः**——कोणी म्हणजे ? आपल्या भावी पतिदेवांनीं.

**सौदामिनीः**——काय बरळतां आहां हें तुम्ही ? वेडबीड तर नाहीं ना लागलं ?

**मेघदूतः**——लागलं होतं. पण आतां साफ उतरलं. काल किती शिताफीनं आपण त्यांची सर्व माहिती काढून घेतली. शिकलेले आहेत का ? सांपत्तिक स्थिति कशी आहे ? कर्ज आहे कीं नाहीं ? स्वभाव कसा आहे ? व्यसनी आहेत कीं नाहीं ? शाबास आहे तुमची !

**सौदामिनीः**——कुठल्या पिशाच्चानं आज पछाडलं आहे तुम्हांला ?

**मेघदूतः**——मला मूर्खाला त्या वेळीं वेगळींच स्वप्नं पडत होतीं. हं जाऊं दे. पण महाराज सरकारांची स्वारी कशी येत नाहीं अजून ?

**सौदामिनीः**——महाराज सरकार ! ! ही काय थट्टा चालवली आहे माझी ?

**मेघदूतः**——मला गरिबाला मोठ्या माणसांची थट्टा करणं कसं शोभेल, वहिनीसाहेब महाराज ?

**सौदामिनीः**——वहिनीसाहेब महाराज ? हें खास कालचं उट्टं काढतां आहां तुम्ही...हं चालूं दे.

**मेघदूतः**——राजकुमार महाराज येईपर्यंत आपल्याला विचारायची परवानगी घेतों कीं आपल्या प्रत्येक गोष्टीमागें आदमासें किती चित्रं पाहिजेत आपल्याला ? ( तिच्या लिखाणाचें बाड आणतो. )

**सौदामिनीः**— ( आश्चर्यानें ) हें बाड तुमच्याजवळ कसं आलं ?

**मेघदूतः**— कसं म्हणजे काय महाराज ? आपणच दिलंत.

**सौदामिनीः**— कुणाला, तुम्हांला ?

**मेघदूतः**— माझं एवढं भाग्य कुठें आहे सरकार ?

**सौदामिनी**— आतां थट्टा पुरे झाली. हें बाड तुम्हाला कुणीं दिलं तें सांगा लवकर.

**मेघदूतः**— राजकुमार शरच्चंद्र महाराजांनीं तें मला दिलं.

**सौदामिनीः**— आणि त्यांच्याजवळ हें कसं आलं ?

**मेघदूत**— त्यांच्या प्रियतम प्रवासिनीदेवींनं तें त्यांना दिलं. तेव्हां तें त्यांच्याजवळ आलं.

**सौदामिनीः**— प्रवासिनीनें त्यांना दिलं ? शक्य नाहीं. प्रवासिनी हांका मारायला त्यांना भेटली होती कधीं तें द्यायला ?

**मेघदूत**— उभयतां स्वाऱ्यांची भेट प्रथम आगगाडींत झाली महाराज. राजकुमार त्यावेळीं नेरळला उतरले.

**सौदामिनीः**— बरं ! बरं !! असं आहे होय ?

**मेघदूतः**— हें वेड किती वेळ पांघरणार प्रवासिनीदेवी ? आपली निवड अतिशय उत्तम आहे. माझ्या मित्राची निवड त्याहून सरस आहे. आपल्या उभयतां स्वाऱ्यांचा जोडा अगदीं लक्ष्मीनारायणाप्रमाणें शोभेल.

**सौदामिनीः**—लग्नही ठरलं वाटतं दोघाचं ?

**मेघदूतः**—हें काय मी आपल्याला सांगायचं सरकार ?

**सौदामिनीः**—( हात जोडून ) आतां महाराज, कांहीं एक सांगू नका. मी सांगतें तेवढं ऐका मात्र. तुमच्या मित्राचं लग्न माझ्या मैत्रिणीशीं ठरलं आहे. समजलं ? माझा कांहीं एक संबंध नाहीं त्यांत !

**मेघदूतः**— मग लेखिका प्रवासिनी कोण ?

**सौदामिनीः**—लेखिका प्रवासिनी कोण ? आली का आतां वचनभंग करण्याची पाळी.

**मेघदूतः**—छे, छे महाराज. माझ्यासारख्या गरीबाकरतां एवढं मोठं पाप शिरावर घेण्याची तसदी घेऊं नये सरकारांनीं.

**सौदामिनीः**—नसती घेतली पण हें दुसरं चालतं बोलतं पाप उभं राहिलं आहे ना माझ्यासमोर. ऐका आतां, खरी लेखिका मी. उसनी लेखिका ती. माझं खरं नांव कुणालाही न सांगण्याचं वचन माझ्याकडून घेऊन माझं लिखाण तिनें आत्मसात् केलेलं दिसतं आहे.

**मेघदूतः**— दिसतं आहे ? म्हणजे हीं लबाडी तुम्हांला आजपर्यंत माहीत नव्हती ?

**सौदामिनीः**—नाहीं ना. म्हणून तर तुमच्या पुष्पवृष्टीचा इतका वेळ थांगपत्तासुद्धां लागेना.

**मेघदूतः**—पाहिलंत ! पुरुषापेक्षां बायका किती जास्त लबाड असतात त्या ? माझ्या मित्रानें मला सरळ सांगून सवरून चित्रकाराचं सोंग घेतलं आणि तुमच्या मैत्रिणीनें तुम्हांला कळूंसुद्धां दिलें नाहीं.

**सौदामिनीः**—नाहीं ना. कसब लागतं, लबाडीसुद्धां इतक्या शिताफीनं करायला !

**मेघदूतः**—ती कला नाहीं बुवा आमच्यांत.

**सौदामिनीः**—दोघं एकमेकांना तर हातोहात फसवताहेत ना ?

**मेघदूतः**—आतां तुमचं खरं नांव सांगा.

**सौदामिनीः**—सौदामिनी.

**मेघदूतः**—सौदामिनी ? मग जुळलं ( टाळी वाजवतो. )

**सौदामिनीः**—काय जुळलं ?

**मेघदूत**:––सौदामिनी मेघदूत.

**सौदामिनी**:––इश्श !

**मेघदूत**:—उसन्या नांवांपेक्षां खरीं नांवंच जास्त जुळताहेत, नाहीं का ? प्रवासिनी-शरच्चंद्र किती घाणेरडं लागतं कानाला. शीः ! आपल्याला तर बुवा सौदामिनी–मेघदूत अगदीं बेफाम पसंत आहे. सौदामिनी–मेघदूत; मेघदूत-सौदामिनी !

**सौदामिनी**:—पुरे झालं ! आतां कबूल केलेलं भिकारणीचं चित्र दाखवा कीं आम्हांला.

**मेघदूत**:—दाखवतों. पण आधीं कविता म्हणून दाखवली पाहिजे.

**सौदामिनी**:—वा ! ही बरी आपली प्रत्येक वेळीं शिक्षा.

**मेघदूत**:––मग करूं नयेत कविता म्हणजे कोणी म्हणायलाही सांगणार नाहीं.

**सौदामिनी**:—हो ! सांगतील कीं, तांब्यांच्या, गडकऱ्यांच्या, यशवंतांच्या, गिरीशांच्या म्हणायला सांगतील ना !

**मेघदूत**:—होय ना ? मग एवी तेवी सुटका नाहींच तेव्हां म्हणून टाका कशा लवकर.

**सौदामिनी**:–

( **चालः**–( अभंगाची ) नाम पावन पावन )

**भिक्षा घाली करि कल्याण। दारिं आली भिकारीण।**
**देई तुकडा शीळें अन्न। समाधानी भिकारीण।**
**जाई वाया उरलें अन्न। अर्धपोटी भिकारीण।**
**झोळि उघडी घाली दान। हात जोडी भिकारीण।**
**दयाघन लक्ष्मीवान। गूण गाई भिकारीण।**
**कासावीस होई प्राण। कळवळे भिकारीण।**

दारों दारीं वणवण। हिंडे कोण? भिकारीण।
आग पोटिं वरती उन्ह। बाळ कडे, भिकारीण।
बाळ तूझें तृप्तवदन। गहिंवरे भिकारीण।
बाळ माझें दूधावीण। भिक्षा मागे भिकारीण।

( गाणें म्हणत असतांच मेघदूत चित्र तिच्यापुढें धरतो. चित्राकडे पहात ती कविता पुरी करते. )

---

( **प्रवेश दुसरा**–शरद्च्या वाड्यांतील खोली. भाऊ उभा आहे. शरद् येतो. )

**शरद्** :—काय पाहिजे ?

**भाऊ** :—वेडाच्या भरांत कमलिनीनें कांहीं वेडंवाकडं केलं, कुमारसाहेब ( रडूं लागतो. )

**शरद्** :—म्हणजे झालं तरी काय ? नीट स्पष्ट सांगा.

**भाऊ** :—ही तिची चिठ्ठीच वाचा, कुमारसाहेब, म्हणजे समजेल. ( चिठ्ठी देतो. )

**शरद्** :—( वाचीत ) "माझा शोध करण्याच्या भरीस पडूं नको. या जगांत आतां मी तुझ्या हातीं फिरून लागणार नाहीं. मी कायमची सुटलें. कमलिनी " केव्हां सांपडली ही चिठ्ठी तुम्हांला ?

**भाऊ** :—काल सकाळीं.

**शरद्** :—ती गेली कशी बाहेर ? तुमचा पहारा असे ना तिच्यावर ?

**भाऊ** :—खिडकीचा गज वांकवून गेली, कुमारसाहेब.

**शरद्** :—खिडकीचा गज वांकवून गेली ! इतकं बळ कुठून आलं तिच्यांत ?

**भाऊ** :—मलाही त्याचंच आश्चर्य वाटतं आहे. मात्र हल्लीं जोरजोडी वगैरे करायचं वेड लागलं होतं तिला.

**शरद्ः**—विहिरीबिहिरी शोधल्यात का सगळ्या ?

**भाऊः**—शोधल्या, कुमारसाहेब. अजून कांहींच कुठें सांपडलं नाहीं.

**शरद्ः**—( स्वगत ) हें बरं झालं एकाअर्थी ! ( जाऊं लागतो. )

**भाऊः**—कुमारसाहेब...पैशाची थोडी अडचण होती.

**शरद्ः**—आतां काय मी तुमचं देणं लागतों ? बहिणीचं नातं होतं. ती गेल्यावर तुम्ही कोण माझे ?

**भाऊः**—बरं आहे. मी प्रवासिनी देवींना भेटून कमलिनीची सारी हकीकत सांगतों म्हणजे कदाचित्...

**शरद्ः**—असं, असं. लग्नांत विघ्न आणायचं आहे होय ?

**भाऊः**—आजपर्यंत कधीं कोणाचं लग्न मोडलेलं नाहीं, कुमारसाहेब. आपण थोडा विचार केलात तर ह्यावेळींही तशी पाळी कशाला येईल ?

**शरद्ः**—किती पाहिजेत ?

**भाऊः**—हजार दिलेत तरी पुरे आहेत सध्यां.

**शरद्ः**—आणखी नकोत का ?

**भाऊः**—सध्यां नकोत. लागले म्हणजे आपण आहांतच, कुमारसाहेब.

**शरद्ः**—ही तंबी आहे का आणखी वर ?

**भाऊः**—तंबी नाहीं, कुमारसाहेब. आतां आमचं गरिबाचं आपल्याखेरीज कोण पहाणार ?

**शरद्ः**—पहातों हं. नीट पहातों. बसा जरा. आतां पाठवतों खजिनदारांना पैसे देऊन. ( जातो. भाऊ थोडा वेळ बसतो. कोणी येत नाहीं असें पाहून हिंडूं लागतो. )

**भाऊः**—कोण आहे रे तिकडे ? अहो खजिनदार ! ( दोन गडी दोहींकडून येऊन भाऊचे हात धरतात. ) अरे कोण तुम्ही ? सोडा मला.

**पहिला गडी**— चला. आमच्या संग चला.

**भाऊः**—खजिनदार कुठें आहेत ?

**दुसरा गडीः**—त्ये हायत न्हवं का खालीं. चला दावितों तुमास्नी.

**भाऊः**—मग त्यांना दे पाठवून इकडे.

**पहिला ग०ः**— नग नग. तुमीच चला तकड.

**भाऊः**—कुठें नेतां मला ?

**दुसरा ग०ः**— तळघरांत नेतूया. अक्षी थंड हाय थतं. उलीसं पर उकडत न्हाई. चला बिगी बिगी.

**भाऊः**— कां म्हणून ? मला तळघरांत कां म्हणून नेणार ?

**पहिला ग०ः**— त्ये आमास्नी काय ठावा ? आम्ही हुकमाचे धनी ?

**भाऊः**— हा जुलूम झाला. किती दिवस ठेवणार मला कोंडून ?

**दुसरा ग०ः**— म्हाराजांचा सोडायचा हुकूम व्हईस्तोंवर.

**भाऊः**— ही बळजबरी झाली. अरे ए ! कोणी नाहीं का तिकडे ? कुमारसाहेब !

**पहिला ग०ः**— ( त्याच्या तोंडावर हात ठेवतो ) वराडलास तर बोळा कोंबून मुस्काट बांधीन. चलतोस निपुटपणीं कां...( दोघे त्याला घेऊन जातात. )

---

( **प्रवेश तिसरा**-मेघदूतची खोली. मध्यें एक लाकडी विभागणी घातली आहे. एका बाजूला शरद् मंजिरीचें चित्र काढण्याचें नाटक करीत आहे. दुसऱ्या बाजूला विभागणीच्या भोंकांतून मंजिरीकडे पाहून मेघदूत खरें चित्र काढीत आहे. त्याच बाजूला सौदामिनी खरडीत बसली आहे. शरद् " त्रिभुवनिं धुंडुनि " हें पद अर्धवट म्हणत, अर्धवट गुणगुणत असतो. )

**मंजिरीः**— किती वेळ लागेल हें चित्र पुरं व्हायला ?

**शरद्ः**—तें इतक्यांत कसं सांगतां येईल राणीसरकार ? हें काय साधंसुधं चित्र आहे ?

**मेघदूतः**—( पलिकडे ) खरंच नाहीं साधंसुधं चित्र ! कोण कसरत करावी लागते आहे मला ! बच्चंजी, तिप्पट पैसे घेईन या चित्राचे.

**मंजिरीः**—( सभोंवार पाहून ) हीं सर्व चित्रं आपणच काढलींत ? किती सुंदर आहेत.

**शरद्ः**—कसलीं आलीं आहेत सुंदर ? कांहीं तरी रंग फासला आहे झालं.

**मेघदूतः**—( पलीकडे ) अरे वारे तूं. म्हणे कांहीं तरी रंग फासला आहे.

**सौदामिनीः**—मला बघूं दे एकदां भोंकांतून.

**मेघदूतः**—पहा पहा. जोडा कसा छान शोभतो आहे.

**सौदामिनीः**—( पहाते ) तर काय ? अगदीं शेराला सव्वा शेर.

**मंजिरीः**—गोष्टी वाचल्यात का सगळया ?

**शरद्ः**—नुसत्या वाचल्या नाहींत, प्रवासिनी. पारायणं केलीं पारायणं.

**मंजिरीः**—चित्र काढायला केली कां सुरवात ?

**मेघदूतः**—( पलीकडे ) वाटतं तरी काय हिला ? जादूनें येतात कीं काय चित्रं काढतां ?

**शरद्ः**—ही ‘ सामोरी ’ संपल्यावर तें काम घेईन हातीं.

**मंजिरीः**—मग संपवा तर ही लवकर. मी अगदीं गप्प बसतें.

**शरद्ः**—तुझ्या पुस्तकासंबंधीं मला एक कल्पना सुचली आहे.

**मेघदूतः**—ऐकूं दे कसली कल्पना आहे ती.

**शरद्ः**—तुझं पुस्तक सुवर्णाक्षरांत छापवायचं.

**मंजिरी** :—सुवर्णाक्षरांत ?

**शरद्** :—हो. तुझं लिखाण आहेच त्या किंमतीचं ( तिच्या हाताचें चुंबन घेतो. )

**सौदामिनी**:—( पलीकडे ) नशीब म्हणतात याला ? काय चमत्कार पहा ! इतके दिवस माझ्या लिखाणाला कोणी विचारलंही नव्हतं.

**मेघदूत**:—( पलीकडे ) आम्ही म्हणजे कोणीच नाहीं वाटतं ?

**सौदामिनी**:—तुम्हीं विचारायला तरी आधीं छापून तर यावं लागतं ना कशांत तरी ? दहा ठिकाणीं पाठवावं तेव्हां कुठें कशांत तरी रडतखडत प्रसिद्ध होई.

**मेघदूत**:—आतां निघणार आहे ना पण सुवर्णाक्षरांत छापून ? ऐट आहे बुवा एका माणसाची !

**सौदामिनी**:—हो. तें माझं म्हणून थोडंच छापणार आहे कुणी ? ही बया गाजवते आहे ना आपली मालकी.

**मेघदूत**:—पण तुमचं नांव तरी पहिलंच शिल्लक राहिलं आहे. माझं तर तितकंही भाग्य नाहीं.

**सौदामिनी**:—काय हो ! आतां हें जन्मभर असंच चालायचं का ?

**मेघदूत**:—छे हो. या दोघांच्यावर एकदा अक्षता पडल्या, कीं संपेल यांचं सारं नाटक.

**मंजिरी**:—प्रत्येक गोष्टीमागें किती चित्रं काढणार आहांत आपण ?

**शरद्**:—तूं सांगशील तितकीं. आतां तूं सांगणार आणि मी ऐकणार. सांग किती काढूं ? एक दोन, तीन, चार...

**मंजिरी**:—माहीत आहे आम्हांला, आपल्याला शंभरपर्यंत अंक मोजतां येतात ते !

**शरद्**:—( तिच्या भोंवतीं आपले हात टाकीत ) प्रवासिनी, तूं सर्वस्वी माझी केव्हां होणार ?

**मेघदूत**:—( पलीकडे ) हारी विठ्ठल! आतां हें असंच पाघळणार असलं तर मी चित्र तरी कसा काढणार ?

**शरद्**:—सांग ना. तूं माझी केव्हां होणार ?

**मंजिरी**:—आतां दुसऱ्या कोणाची आहें वाटतं ?

**शरद्**:—सर्वस्वीं माझी कुठें आहेस ? रात्रीं जरा जास्त वेळ तुझ्याशीं गप्पा मारीत बसलों तर तुझ्या त्या तुळसाबाई मला हांकलून देतात.

**मंजिरी**:—हांकलून नाहीं देत बरं का !

**शरद्**:—नाहींतर काय ? तुला सांगतात “ गो मंज्ये, निजाया चल. पुस्काल बडबडलीस ” म्हणजे आम्हांला हांकलून देणंच नाहीं का झालं ?

**मंजिरी**:—त्याला इलाज नाहीं. तुळसाचा सासुरवास आतां आपल्याला जन्मभर सोसावा लागणारच्च.

**शरद्**:—काय कारण आहे ? आपलं लग्न झालं कीं, आपण तिला कोंकणांत पाठवून देऊं.

**मंजिरी**:—ती बसली आहे जायला.

**शरद्**:—पण आपण नाहीं बोवा तिला नेहमीं आपल्याबरोबर बाळगणार.

**मंजिरी**:—असं होय ? मग मलाही बरोबर बाळगायची जरूरी नाहीं.

**शरद्**:—असा काय बरं लहान मुलासारखा हट्ट करावा ? ( तिच्या हनुवटीला हात लावतो. )

**मंजिरी**:—पुरे झाला मानभावीपणा. ( आंगठी काढते. ) ही घ्या आपली मुद्रिका. तुळसाला सोडून राहायचं असेल तर मला नाहीं तुमच्याशीं लग्न करायचं. ( आंगठी त्याच्या खिशांत टाकते. )

**सौदामिनी**:— ( पलीकडे ) शाबास मांजिरी. प्यायल्या दुधाला जागलीस आतां दहा गोष्टी लिहितें तुझ्याकरतां.

**शरद्**:— बरं, आपण प्रथम कांहीं दिवस तिला बरोबर नेऊं, मग तर झालं ?

**मंजिरी**:— कशाला उगीच. आपल्याला लाज वाटते ना तिची ?

**शरद्**:— पण करीन मी संवय. तुझ्यासाठीं काय वाटेल तें करीन.

**मंजिरी**:— मला तिच्याशिवाय राहतां येणार तरी कसं ? माझं मला कांहींसुद्धां करतां येत नाहीं.

**शरद्**:— मग आतां हंसा पाहूं एकदां. आम्ही तुळसाला बरोबर न्यायला तयार आहोंत.

**मंजिरी**:— नुसती कांहीं दिवस नाहीं. नेहमीं जवळ पाहिजे मला.

**शरद्**:— कबूल. अगदीं जन्मभर. तुझी आज्ञा असेल तर तिच्याशीं लग्नसुद्धां करायला तयार आहें मी.

**मंजिरी**:— ती बसली आहे तुमच्याशीं लग्न करायला ! मलाच कुठें परवानगी देत होती.

**शरद्**:— आम्हीं काय बुवा तिचं घोडं मारलं आहे ?

**मंजिरी**:— काय म्हणजे ? तिच्या लेकीचं सामान चोरीत होतां ना आगगाडींत.

**शरद्**:— आणि आतां तर लेकीलाच चोरतों आहे. खरं ना ? मग बोल. तूं माझी कधीं होणार ?

**मंजिरी**:— लग्न कोणच्या पद्धतीनें करायचं ?

**शरद्**:— वैदिक पद्धतीनें. रजिस्टर नको रे बुवा.

**मंजिरी**:— तें कां ?

**शरद्:**— अग पंधरा दिवस थांबावं लागतं ना जाहीर केल्यावर? आम्हांला कुठें आहे इतका धीर.

**मंजिरीः**— इश्श! तुळसा असती तर म्हणाली असती कांहीं तरी.

**शरद्:**—हंस. अशीच हंस. किती गोड दिसतेस अशी हंसलीस कीं.

( **चालः**–पावना, वामना, यामना. )

**स्वामिनी, शोभिनी, मोहिनी**
**दे सुख नयनीं निरंतर हासिनी।**
**क्षणांत रुसुनी, क्षणांत फुगुनी**
**हासुं फुटे झणीं लोचनीं। दे सुख...**
**पाठमोरि होउनि सामोरी**
**धन्य करी मज जीवनीं दे सुख...**
**प्रीतिपर्वतशिखरीं शोभे**
**शरच्चंद्र ही प्रवासिनी। दे सुख...**

( आलिंगन देतो. )

**मेघदूतः**—( पलीकडे ) चला झाली फिरून सुरवात.

**शरद्:**— मग बोल, उद्यां करायचं कां लग्न?

**मंजिरीः**— अगदीं उद्यांच?

**शरद्:**— अग, भटजी बोलावला तर आतां सुद्धां लावून टाकील.

**मंजिरीः**—हो, आतां लावतोय्. उगीच आपली अतिशयोक्ति करायची.

**शरद्:**— शपथ अतिशयोक्ति नाहीं. बोलावूं का आतां भटजीला?

**मंजिरीः**— बोलवा पाहूं.

**शरद्:**— मग मागें नाहीं हं घ्यायचं. कबूल?

**मंजिरीः**— कबूल. पण तुळसा आली पाहिजे बरं का ?

**शरद्ः**— हो तर. तिच्याशिवाय कसं तुझं कन्यादान होणार. बघ चाललों. सांगतों हं भटजीला बोलवायला ( जातो. )

**मेघदूतः**— ( पलीकडे ) काय लग्न आहे का नाटक आहे ?

**सौदामिनीः**— तुम्हाला कशाला हव्यात चवकशा. तुम्ही काम करा आपलं ( मंजिरी उठते. तोंडाला पावडर लावते. भिंतीवरचीं चित्रें पहाते. घोड्याकडे जाते पण परत फिरते. फिरतां फिरतां तिचा धक्का विभागणीच्या दाराला लागतो. तें उघडतें. ती आंत जाते. मेघदूत काढीत असलेलें आपलें चित्र पहाते. सौदामिनी तिला दिसत नाहीं. लगेच बाहेर येते. शरद् काढीत असलेलें चित्र पाहते. संतापते. इतक्यांत शरद् येतो.)

**शरद्ः**—आत्तां येईल भटजी...बरं. चला राणीसरकार तोंपर्यंत आपल्या सिंहासनावर पुनरपि विराजमान व्हा.

**मंजिरीः**—इथं काय वाईट आहे ?

**शरद्ः**— चित्र पुरं करायचं आहे ना आपलं ? मग आपण फिरून आपल्या आसनावर बसल्याखेरीज कसं काढतां येईल चित्र ?

**मंजिरीः**— आपण काढतां आहां तसलं चित्र ना ? एकादं कुत्रं आणून बसवलं तिथें तरी येईल तसलं चित्र काढतां.

**शरद्ः**— काय काय बोलते आहेस तूं ?

**मंजिरीः**— ( घोड्यावरचें चित्र रागांत फाडून आणते ) हें ! हें माझं चित्र ! एकादं पोर तरी बरं काढील याच्यापेक्षां.

**शरद्ः**— म्हणजे ? कळलं तुम्हांला सारं ?

**मंजिरीः**— हो कळलं बरं. आपला भाडोत्री चित्रकारही पाहिला मीं. काय आव आणला होता पण चित्रकाराचा ! म्हणे हीं सगळीं चित्रं मीं काढलीं. साफ खोटं. सगळं बनावट. एकूण एक बाता.

**शरद्ः**— मी खालीं गेलों तेंच चुकलं. करायला गेलों एक, नी झालं दुसरंच.

**मंजिरीः**— तरी तुळसा मला पहिल्यापासून सांगतच होती कीं " त्या लफंग्याच्या नादीं लागूं नको. तो लबाड आहे. "

**मेघदूतः**—( बाहेर येत ) तो असला लबाड तरी तुम्ही सवाई लबाड आहांत, एवढं लक्षांत ठेवा, बाईसाहेब.

**मंजिरीः**—हें पहा. उगीच ओळख देख नसतांना माझ्याशीं बोलूं नका.

**शरद्ः**—कां नको बोलूं ? त्याची बाजू मला उचलून धरलीच पाहिजे.

**मंजिरीः**—होंहि काम करावं लागतं वाटतं मालकांचं ? नुसतीं चित्रं काढून नाहीं भागत ?

**मेघदूतः**—सांगतों हं. कुणाकुणाला काय काय कामं करावीं लागतात तीं. काढतों मीं याचीं चित्रं. पण बाईसाहेब, तुमच्या गोष्टी, कविता कोण लिहितं तेंहि एकदां सांगून टाका कीं, म्हणजे कुणाकुणाला कुणाकुणाचीं काय काय कामं करावीं लागतात त्याचा उलगडा होईल एकदां.

**मंजिरीः**—( चपापून ) माझ्या गोष्टी, कविता ? कसली धमकी घालतां आहां मला ?

**मेघदूतः**—सांगतों हं. ताबडतोब सांगतों. ( आंत जाऊन सौदामिनीला बाहेर घेऊन येतो. ) या हो या. बाहेर या. आतां सगळा निकाल लावलाच पाहिजे. हं बोला आतां. खरी लेखिका कोण ?

**शरद्ः**—या कोण ? ( सौदामिनी खालीं पहाते. )

**मंजिरीः**—अस्सं. खाल्ल्या अन्नाला अशी जागतेस एकूण.

**सौदामिनीः**—रागावूं नको मंजिरी. मी गोष्टी लिहीत असतांना आणि हे चित्र काढीत असतांना, बंडगार्डनवर आमची अचानक ओळख झाली.

**शरद्ः**—अरे ऽ ऽ

**सौदामिनीः**—तव्हां परस्परांचे व्यवसाय परस्परांना आपोआपच कळले. आणि जर अशा अकल्पितपणें गोष्टी उघडकीस आल्या नसत्या तर आम्हांपैकीं कोणीही गौप्यस्फोट केला नसता. शपथ सांगतें, मंजिरी.

**शरद्ः**—( मेघदूतला ) अस्सं ! एकूण तुमचं दोघांचं जुळलं होतं वाटतं, चोरा ?

**मंजिरीः**—लाजही वाटत नाहीं चेष्टा करायला !

**शरद्ः**—तरीच, लेका तीं पाठमोरी सामोरी अगदीं जमून येत नाहीं कां?

**मंजिरीः**—फाडून टाका आतां ती " पाठमोरी " नी " सामोरी ".

**मेघदूतः**—तर तर ! अगदीं वाटेवरच्च पडलीं असतील ! आम्ही आमच्या कलाकृति कां म्हणून फाडून टाकूं ? आतां आम्हीच प्रसिद्ध करूं तें सचित्र पुस्तक. सुवर्णाक्षरांत नाहींतर नाहीं. आमचा आपला काळा छापच. काय हो ? तुम्हांला आहे का कबूल ? लेखिकाः सौदामिनी, चित्रकारः मेघदूत.

**शरद्ः**—वा ! नांवंही कशीं झोकांत जुळताहेत. एकूण लेका माझं फिसकटलं आणि तुझं जमलं.

**सौदामिनीः**—कांहीं कुणाचं फिस्कटायला नको. दोघांचेही अपराध तेच. दोघांनींही कातडीं पांघरलीं होतीं, तीं आतां उतरलीं. बरोबर फिटं-फाट झाली आहे.

**मेघदूतः**—तेव्हां आतां विसरून जा सगळं.

**सौदामिनीः**—नाहींतर हंसा एकमेकांना पोटभर.

**मेघदूतः**—हो. आम्ही पण सामील होऊं त्यांत.

**शरद्**ः—आपल्याला हंसणं पत्करतं बुवा. काय प्रवासिनी ?

**मंजिरीः**—चुलींत गेली तुमची प्रवासिनी !

**शरद्**ः— अरे हो चुकलों. ( सौदामिनीला ) काय नांव आहे म्हणालांत यांचं ?

**सौदामिनीः**— मंजिरी.

**शरद्**ः— मंजिरी ! वा ! फार सुंदर नांव आहे. मंजिरीदेवी, हा दास आपल्याला सर्वस्वीं शरण आहे आणि पुनरपि आपल्या पाणिग्रहणाची याचना करीत आहे.

**सौदामिनीः**— गडे मंजिरी. हो ना कबूल. रागावूं नको बाई माझ्यावर. नाहींतर माझं मन मला जन्मभर खात राहील बघ. एवढं काय मनावर घ्यायचं ग ? गंमत म्हणून सोडून द्यावं झालं. नाहींतरी लग्न झाल्यावर जन्मभर भारींच हीं सोंगं टिकवतां आलीं असतीं.

**शरद्**ः—तें मात्र अगदीं खरं. इतका पुढचा विचार आपण कांहीं केला नव्हता बुवा.

**मंजिरीः**— आणि मी तरी कुठं केला होता ?

**शरद्**ः— होय ना ? झालं तर मग...

**सौदामिनी**ः— मग आहेस ना कबूल लग्नाला ?

**मंजिरी**ः— माझी फजिती तुळसाला कळतां कामा नये.

**सौदामिनी**ः— कबूल. तुझ्या गळ्याची शपथ.

**मेघदूतः**— चला, जमलं अखेरीस. ( शरद्ला ) शेराला सव्वा शेरच भेटली, महाराज.

**सौदामिनी**ः—बरं, मंजिरी जातें मी आतां.

**मेघदूतः**— आच्छा वहिनीसाहेब, आम्ही पण येतों. अधिक उणं बोललेलं विसरून जा हं.

**शरद्ः**— चाललांत कुठें. थांबा. आमच्यावर अक्षता टाकायच्या सोडून चाललांत कुठें ? आतां येतील भटजी आमचं लग्न लावायला.

( कमलिनी रागारागांत प्रवेश करते. )

**कमलिनीः**—मी जिवंत असतांना पाहूं कुणाशीं लग्न लावतां तें.

**मेघदूतः**—वहिनी तुम्ही इथें कशा आलांत ? डोकं बिकं बरं आहे ना ?

**कमलिनीः**—होय बरं, भाऊजी, डोकं चांगलं शाबूत आहे.

**शरद्ः**—अं ? तूं इथें ? पण तूं पुन्हां जिवंत झालीस कशी ?

**कमलिनीः**—मेलें होतें कधीं पुन्हां जिवंत व्हायला ?

**मेघदूतः**—अरे शरद्, वहिनी आतां अगदीं बऱ्या झालेल्या दिसताहेत. तूं तें सांगितलेलं साफ उतरलं वाटतं.

**कमलिनीः**—वेड ना ? भाऊजी, मला वेड कधीं लागलंच नव्हतं मुळीं. यांच्याकडून पैसे उकळायसाठीं माझ्या भावानें नुसतं तसं उठवलं होतं आणि मला ठेवली होती नजरकैदेंत.

**शरद्ः**—काय दुष्टपणा तरी ! सख्खा भाऊ इतका नीच असूं शकेल, असं मला नव्हतं वाटलं.

**कमलिनीः**—कुण्णी कुणाला नांवं ठेवायला नकोत. सख्खा भाऊ नि सख्खा नवरा दोघेही सारखेच. नवऱ्यानें तरी काय कमी छळलं मला ?

**शरद्ः**—नवरा नवरा काय करतेस ? कांहीं मान ठेवशील कीं नाहीं माझा ?

**कमलिनीः**—मान ? मान आपला आपण ठेवून घ्यावा लागतो, कुमार-

साहेब ! बायकोला मारहाण करायची, आणखी कुणी सटव्या तिच्या उरावर आणून नाचवायच्या. मग कसा राहील मान ? भाऊजी, तिगस्तां तर यांनीं जवळजवळ मला स्वर्गालाच पाठवली होती. पण मी कसली खंबीर ! मीं उतरलें खालीं.

**मेघदूतः**—हें सगळं खरं आहे, शरद् ?

**मंजिरीः**— या बाई कोण ?

**कमलिनीः**—मी कोण ? सांगतें ऐका हं. देवाब्राह्मणांनीं दिलेली यांची मी बायको. समजलांत.

**मंजिरीः**—म्हणजे ? पहिली बायको जिवंत असतांना तुम्ही माझ्याशीं लग्न करणार होतां ?

**शरद्ः**—अग पण तुझा भाऊ आतांच सांगून गेला कीं तूं जीव दिलास म्हणून.

**कमलिनीः**—तर तर ! बसलें आहे जीव द्यायला ? नवरा दुसरी बायको करायला निघाला म्हणून जीव देणाऱ्या नेभळट बायकांपैकीं मी नव्हे, समजलांत ? झिंज्या धरून बाहेर काढीन कोण असेल तिला. जीव नाहीं देणार ! घेईन हवा तर तिचा जीव. पण माझा जीव नाहीं देणार. ( मंजिरीवर धांवते. शरद् तिला अडवतो. )

**शरदः**—बरं बरं. समजला शहाणपणा ! भावाकडे राहून फार शेफारली आहेस. जातेस आतां मुकाट्यानें वाड्यांत कीं देऊं एक......( हात उगारतो. )

**कमलिनीः**—( शरद्च्या थोबाडींत मारते ) देऊं नका पतिराज, ही घ्या माझ्याकडून, पुष्कळ बाकी परत करायची आहे बरं. आतां मी ती पूर्वीची शेळपट कमलिनी राहिलें नाहीं समजलांत. आतां बोला, ह्या

सटवीला मुकाट्यानें बाहेर काढतां कीं, मीच झिंज्या धरून काढूं तिला बाहेर ? ( मंजिरीवर धांवते. )

**तुळसा:—**( प्रवेश करीत ) कुनाची गो माय विआली हाय तिच्या झिंज्या धरून ब्हाईर काडाया ?

**कमलिनी:—** तूं कोण ?

**तुळसा:—** तुजी आखाडसासू. तिणेंन् गो काय घोंडा मारलान् तुजां, झिंजिच्ये ?

**कमलिनी:—** माझ्या उरावर बसून लग्न कां निघाली करायला माझ्या नवऱ्याशीं ?

**तुळसा:—** हाय कुटां तुजा न्होवरा ? ( कमलिनी शरद्‌कडे पहाते. ) हा लफंग्या व्हय ? नी त्याणेन् तिला भारीच सांगतलां असल पहिली बायको हायशी. ठावां कुनाला योक हाय का दोन हायत का धा हायत त्या. नी काय गो नगरभोवान्ये हाय तुजा दादला, तर त्येला टाकून गेली व्हतीस कुटां मुलुक मोडाया ?

**कमलिनी:—** मी नगरभवानी, माझा नवरा लफंग्या नी ही बाजार-बसवी अगदीं स्वर्गांतूनच खालीं उतरली असेल ?

**तुळसा:—** हां चाप बस, न्हाईतर मुस्काट फोडीन.

**कमलिनी:—** कां चाप बसेन ? नायकिणीची पोर तर आहे.

**शरद्:—** कोण ? कोणी सांगितलं तुला हें ?

**कमलिनी:—** विचारा तिलाच. दुसरं लगीन करून करायचं होतं तर तुम्हांला नायकिणीच्या पोरीखेरीज दुसरी कोणी मिळाली नाहीं वाटतं ?

**शरद्:—** मला कुठें हें माहीत होतं ? छान ! चांगलीच होणार होती आमची ! तूं मला एका मोठ्या संकटांतून सोडवलंस, म्हणायचं.

८

**सौदामिनीः**— आणि मंजिरी काय कमी संकटांतून बचावली आहे ? असेल ती नायकिणीची मुलगी. आपला जन्म कुणाच्या हातांत नसतो पण तुम्ही एवढे राजघराण्यांत जन्माला येऊन काय दिवे लावलेत, तें सांगितलंच मघाशीं तुमच्या बायकोनें.

**तुळसाः**— काय गो सांगतलान् तिणेन् ?

**सौदामिनीः**— अग हे राजकुमार मरेमरेस्तोवर मारीत असत तिला आणि सगळे धंदेही करीत असत राजरोस म्हणून भावानें नेली होती तिला घरीं. बरं झालं बाई मंजिरी, सुटलीस या चांडाळाच्या तावडींतून.

**कमलिनीः**— खबरदार ! त्यांना शिव्या देशील तर.

**तुळसाः**— आपलाच दाम खोटा नी वराडत्येस कशाला दुसऱ्यावर ? दाद्ला नांद्वता येईना आपल्येला, नी निंगाली दुसऱ्यावर आग पाखडाया ! मोकाट सोडत्ये त्येला लोकाच्या चोऱ्या कराया. जा, घऊन जास तुज्ये घोवाला. व्होवा कुनाला असला डांबीस माणूस. तरी मंज्ये मी तुला पैल्यान् सांगितला व्हता कीं हये लफंग्याच्ये नादीं लागूं नुको म्हणून.

**कमलिनीः**— कोणाला शिव्या देतेस म्हातारडे ? थोबाड रंगवीन.

**तुळसाः**— रंगव गो रंगव. तीन तुकडं करीन तुजंच, नाय ठावां. माजा थोबाड रंगवत्ये घाटीण. कोलीन हाय मी कोकनची. बाप्याला पर नाय ऐकायची. चेंचून टाकीन तुला. नाय ठावां ! ( दोघी एकमेकींवर धांवून जातात. तुळसाला मंजिरी आणि सौदामिनी आवरून धरतात. कमलिनीला शरद् आणि मेघदूत आवरून धरतात. )

**शरद्ः**— ( कमलिनीला ) हं चला आतां वाड्यांत ( दोघं जातात. )

**तुळसाः**— मंज्ये चल घरास. बेश झालां हये लफंग्याच्ये तावडींतून बेगन् सुटलीस. असला अर्धा मुर्दा नोवरा व्होवा कशाला, मी तुला योक काय, अचके धा नोवरे मिलवून देत्ये बघ. तूं कां अशी भ्येत्येस ? ( मांजि-

ीला घेऊन जाते. भटजी पळीपंचपात्री घेऊन ओम्......इत्यादि ुट पुटत येतात. )

**भटजी:**—ॐ श्रीमन् महागणाधिपतये नमो नमः। इथें लग्न कोणाचं लावायचं आहे ?

**मेघदूत:**—आतां लावा झालं आमचंच.

**भटजी:**—फार उत्तम. ओम्...... इष्टदेवताभ्यो नमः।

पडदा.

